


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्धारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचे मुखपत्र

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृतिमंडळ पुरस्कृत )






प्रकाशन-दिनांक
२० फेब्रुवारी १९६९

वर्ष ४१ : अंक १६७
आक्टोबर-डिसेंबर १९६८

संपादक :
के. नारायण काळे

महाराष्ट्र-साहित्य-परिषद : पुणे २

अनुक्रमणिका







# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष ४३ अंक १६७ १९६८

★

## या अंकात

★



★

अनुक्रमणिका

## महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या
## मालकीसबंधीच्या माहितीचा तक्ता

**( नियम ८ फॉर्म ४ प्रमाणे नियम १९५६ )**

| | | |
|---|---|---|
| १. | प्रकाशन स्थळ | टिळक रस्ता, पुणे २. |
| २. | प्रकाशनकाळ | त्रैमासिक ( सामान्यतः मे, जुलै, आक्टोबर व जानेवारी ) |
| ३. | मुद्रकाचे नाव | द. वा. आंबेकर |
| | राष्ट्रीयत्व | भारतीय |
| | पत्ता | आर्यभूषण प्रेस, पुणे ४. |
| ४ | प्रकाशकाचे नाव | मो. रा. वाळंबे ( चिटणीस, म. सा. परिषद ) |
| | राष्ट्रीयत्व | भारतीय |
| | पत्ता | म. सा. परिषद, टिळक रस्ता, पुणे २. |
| ५. | सपादकाचे नाव | के. नारायण काळे |
| | राष्ट्रीयत्व | भारतीय |
| | पत्ता : | कचरेवाडी, पुणे ४. |
| ६. | मालकसंस्थेचे नाव : | महाराष्ट्र साहित्य परिषद |
| | पत्ता | टिळक रस्ता, पुणे २. |

मी, मोरेश्वर रामचंद्र वाळंबे, चिटणीस, म. सा. परिषद प्रकट करतो की, वरील तपशील माझ्या माहितीप्रमाणे व समजुतीप्रमाणे बरोबर आहे.

**मो. रा. वाळंबे**
प्रकाशक

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

[महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृतिमंडळ पुरस्कृत]

वर्ष ४३ अंक १६७ १९६८


# संपादकीय

## अनुवादयोजना

भारतीय एकात्मता अधिक दृढमूल कशी करता येईल ह्या अलीकडच्या काळातील एक मोठा सार्वत्रिक चिंतेचा विषय होऊन बसलेला आहे. इतर सर्व क्षेत्रांतील विचारवंतांप्रमाणेच साहित्य क्षेत्रातही यासंबंधीचा ऊहापोह अनेकदा अनेक ठिकाणी चालू असलेला ऐकू येतो. एकात्मतेला तडे जाण्याच्या अनेक कारणांपैकी प्रादेशिक अभिमान आणि इतरांविषयीचा अविश्वास अथवा अज्ञान यामुळे निर्माण होणारा गैरसमज, ही प्रमुख असतात असे निदान करण्यात येते. व त्यावर उपाय म्हणून हे अज्ञान दूर केले; परस्परातील समझोता वाढविला; व प्रांतिक स्वाभिमान जाणता केला; तर ही दुरवस्था दूर होईल अशी एक कल्पना आहे.

तिला अनुसरून साहित्यिकांना करता येण्यासारखे कार्य म्हणजे त्यांनी भिन्न भिन्न भाषांतील साहित्यकृतींचा आपल्या भाषांतील वाचकवर्गाला भाषान्तरांच्याद्वारा परिचय करून देण्याचा उपक्रम करणे हा होय. असे केले असता, त्या भाषा न जाणणाऱ्या जनसाधारणालाही परप्रांतीयांच्या जीवनक्रमाच्या वैशिष्ट्याचे ज्ञान होऊन त्यांच्या व आपल्या जीवनातील सारखेपणा व मूलभूत माणुसकी यांची जाणीव होईल व त्याच्या योगाने त्यांचे गैरसमज व पूर्वग्रह दूर होत जाऊन त्यांच्यामधील परस्परांच्या संबंधीची समजूत वाढीला लागून एकात्मता निर्माण होईल अशी अपेक्षा आहे.

प्रामुख्याने सर्जनशील साहित्यातूनच जीवनदर्शन अधिक प्रमाणात होत असल्यामुळे व असे साहित्य जसे उद्‌बोधक तसेच रंजकही असल्याकारणाने, ते वाचले जाण्याची संभवनीयता अधिक असते. त्यामुळे एकात्मतेच्या हेतूने नसले, तरी एका भाषेत लोकप्रिय झालेल्या कथाकादंबऱ्यांचे तर्जुमे अन्य भारतीय भाषांत झाल्याचे दाखले यापूर्वीही उपलब्ध आहेत. नुकत्याच पुणे येथे झालेल्या एका परिसंवादात एका केरळीय साहित्यिकाने, "मल्याळम भाषेत सर्व भारतीय भाषांतील साहित्याचा अनुवाद करण्यात येतो; यामुळे भारतातील कोणत्या भाषेच्या साहित्याची काय परिस्थिती व अस्मिता आहे, याची आम्हाला कल्पना आहे, परंतु आमच्या भाषेतील साहित्याचा मात्र अन्य कोणत्याही भारतीय भाषेत अनुवाद झाल्याचे आपल्या ऐकिवात नाही." असे उद्‌गार काढले होते. हे त्याचे म्हणणे लक्षणीय आहे व त्याच्या अनुषंगाने त्याप्रकारच्या पूर्वीच्या अनुवादाच्या प्रयत्नांचा अपुरेपणा मल्याळमपुरताच नव्हे; तर थोडा अन्तर्मुख दृष्टीने विचार केला असता, सर्वच भारतीय भाषांच्या बाबतीत खरा असल्याचे दिसून येईल.

या कार्याचे महत्त्व आणि त्याची व्यापकता लक्षात घेऊन अखिल भारतीय पातळीवरून नॅशनल बुक ट्रस्ट आणि साहित्य अकादमी यांनी महत्त्वाचे प्रयत्न चालविले आहेत; परंतु या वर्षीच्या मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणात व्यक्त झाल्याप्रमाणे, त्यांचाही पडावा तितका प्रभाव पडतो असे दिसत नाही. त्याची व्याप्ती

अधिक वाढावयाची असल्यास तिला अधिक व्यापक स्वरूप येणे आवश्यक आहे. लेखक, प्रकाशक, समालोचक व राज्यशासन यांच्या सहविचाराने व सहकार्याने या बाबतीत बरेच काही कार्य करता येण्यासारखे आहे.

जानेवारी महिन्याच्या पहिल्या आठवड्यात सुप्रसिद्ध ज्येष्ठ कन्नड साहित्यिक मास्ती व्यंकटेश अय्यंगार आणि कविवर्य बेन्द्रे पुण्याला आले होते. येथील कन्नड बांधवांनी त्या वेळी त्यांचा जो सत्कार केला, तेव्हा काही स्थानिक मराठी साहित्यिकांनाही निमंत्रण देण्यात आले होते. याप्रसंगी मास्ती यांनी अनुवादाच्या या प्रश्नाचा प्रस्ताव करून त्यावर चर्चा करण्यास तेथे जमलेल्या मंडळींस आवाहन केले. अर्थात त्यावेळी कोणत्याही रीतीची निर्णायक स्वरूपाची चर्चा होण्याचा संभव नव्हता. परंतु साहित्य संस्थांनी या संबंधात काहीतरी करणे आवश्यक आहे असा सर्वसाधारण अभिप्राय तीत स्पष्टपणे दिसून आला.

या संबंधात अमुक करावे असे म्हणणे जितके सोपे तितकेच ते करणे कठीण आहे हे खरे असले, तरी कोठेतरी सुरवातही झालीच पाहिजे हेही अटळच होय. या दृष्टीने विचार करता दाक्षिणात्य भाषांतील साहित्याचा परिचय ही आजची उत्तरीयांची, मराठीची तरी, अधिक निकडीची गरज आहे. हिन्दी, गुजराती, बंगाली, उडिया यासारख्या संस्कृतोद्भव भाषांतील साहित्य मराठीत अनुवादित करणे आवश्यक आहे. नाही असे नाही. तरीपण या संस्कृतोद्भव भाषांतील ग्रंथ जर देवनागरी लिपीत छापले; तर थोड्याशा विवरणात्मक टीपा आणि लहानसा शब्दकोश यांच्या साहाय्याने त्यांचा जिज्ञासूना मुळातून आस्वाद घेता येणे संस्कृत आणि हिंदी याच्याशी परिचित असलेल्या मराठी साक्षर वाचकांना अशक्य नाही. परंतु दाक्षिणात्य भाषांचे मात्र तसे नाही. कन्नड, तेलुगू, मल्याळम अथवा तामीळ यांचे केवळ लिप्यंतर करून काहीच साध्य होणार नाही. त्यांतील साहित्य कृतीचे अनुवादच आवश्यक आहेत व त्याकरता काहीतरी परस्पर आदान प्रदानाची योजना होणे अगत्याचे आहे. कारण या कार्याला दोन बाजू असून त्या एकाच वेळी कार्यप्रवण होणे अगत्याचे आहे.

या दृष्टीने स्थूलमानाने सुचविण्यात आलेली कल्पना अशी आहे की प्रयोग म्हणून या चार भाषांतील कविता, लघुकथा एकांकिका, लघुनिबंध, ललित लेख अशासारख्या लहान साहित्य प्रकारांचा एकेक संग्रह मराठीत प्रसिद्ध करावा; आणि अशाच प्रकारचा एकेक संग्रह या चार भाषांतून, मराठी साहित्यामधून निवडलेल्या वाङ्मय प्रकारांचा, त्यांनी प्रसिद्ध करावा. मास्ति व बेंद्रे यांना ही कल्पना पसंत पडून त्यांची तिला मान्यता मिळाल्यास, दक्षिण भारतीय साहित्य परिषदा व साहित्य संस्था यांच्याशी ते विचारविनिमय करू शकतील; आणि परस्पर सहकार्याने असा एखादा नवा उपक्रम सुरू करता आला तर ते अनेक दृष्टींनी हितावह ठरेल अशी अपेक्षा आहे.

के. नारायण काळे

•••

अनुक्रमणिका

# कर्तरी दामले आणि कर्मणी दामले*

● कृ. श्री. अर्जुनवाडकर ●

'कर्तरी दामले आणि कर्मणी दामले' हा माझ्या व्याख्यानाचा विषय वाचून आपणांपैकी काहीजण बुचकळ्यात पडले असतील. संस्कृत किंवा मराठी व्याकरणाशी ज्यांचा थोडाबहुत संबंध आला आहे, त्यांना 'कर्तरी' आणि 'कर्मणी' या संज्ञा तशा अपरिचित नाहीत. या दोहोंचा नरसिंहावतार अशी 'कर्मकर्तरी' हीही संज्ञा कदाचित परिचित नसली ओळखता येण्यासारखी आहे. कर्तरी प्रयोग, कर्मणी प्रयोग असे संज्ञाप्रयोग शाळेतल्या मुलांनाही माहीत असतात. कर्तरी प्रत्यय, कर्मणी प्रत्यय, हेही कधीकाळी कानावर पडते. अलीकडे साहित्य महामंडळाने कर्तरी आणि कर्मणी या दोन प्राण्यांच्या शेपट्या ओढून लांब केल्या असल्या, तरी त्यांची ओळख पटण्याची अडचण पडत नाही. पण कर्तरी आणि कर्मणी हे दामल्यांचे प्रकार, हा प्रकार तरी काय आहे? का 'दामले' हीही एक व्याकरणातली १९११-नंतरची कसली नवी संज्ञा आहे? की 'कर्तरी दामले', 'कर्मणी दामले' या कोण्या नवकाव्यातल्या प्रतिमा वगैरे आहेत?

उत्तर जवळ आले. काव्यातल्या शब्दांचे अर्थ ज्या वृत्तीने समजून घ्यावयाचे, त्याच वृत्तीने कर्तरी आणि कर्मणी हे दोन्ही दामले समजून घ्यावयाचे. दामले म्हणजे अर्थातच मोरो केशव. 'दामल्यांनी मराठीचे शास्त्रीय व्याकरण लिहिले,'– यात दामल्यांचा कारकसंबंध 'कर्तरी' आहे; 'व्याकरणकार दामल्यांना उत्तरकालीन वैयाकरण पारखतात,'– यात दामल्यांचा कारकसंबंध 'कर्मणी' आहे. एकूण, दामल्यांनी रचलेले मराठीचे व्याकरण आणि त्या व्याकरणाचे अन्य वैयाकरणांनी केलेले समीक्षण, हा आजचा माझा नियोजित विषय आहे. या विषयात दामल्यांच्या चरित्रातल्या तपशिलाचा परामर्श मुद्दामच बाजूला टाकला आहे. त्यात नव्याने मांडावे, असे माझ्यापाशी काही नाही. त्यांचे चरित्र त्यांचेच चिरंजीव श्री. दत्तात्रेय मोरेश्वर दामले यांनी 'सरस्वतीचे लाडके पुत्र' या आपल्या अलीकडेच प्रसिद्ध केलेल्या पुस्तकात पुष्कळ तपशिलाने दिले आहे; ते आपल्या माहितीत असेलच. मी माझ्या ग्रंथासाठी दामल्यांचे चरित्र लिहिले, ते त्याच्याच आधाराने. तेव्हा जे आपणांला आधीच माहीत आहे किंवा अनायासाने माहीत होण्यासारखे आहे, ते सांगून मी आपल्या वेळावर ताण पडू द्यावा, हे योग्य नव्हे. त्यापेक्षा दामल्यांच्या व्याकरणाचा आणि त्याविषयीच्या समीक्षावाङ्मयाचा मी जो अभ्यास केला आहे, त्यातला निवडक भाग मी आपल्यापुढे मांडला, तर दामल्यांसारख्या वैयाकरणाची जन्मशताब्दी काहीशा कमी रुळलेल्या पण उचित अशा पद्धतीने साजरी केली, असे होईल. मलाही व्याकरणविषयात माझे अभ्यासफल मांडायला असा प्रसंग, असे व्यासपीठ आणि असा श्रोतृसमाज वारंवार कोठे मिळणार आहे? व्याख्यानविषयाचे हे स्वरूप सांगितल्यावर आणखी एक गोष्ट ओघानेच येते. ती ही की, यात दामल्यांच्या व्याकरणाचे गुण आणि दोष या दोहोंचाही परामर्श येणार. यांपैकी दोषपरामर्श म्हणजे दामल्यांविषयी अनादर असे समीकरण आपण कृपया करू नये. व्यक्तीविषयी आदर हा लौकिक व्यवहाराचा भाग आहे. व्याकरणग्रंथाच्या गुणदोषांची चर्चा हा शास्त्राचा भाग आहे. शास्त्रीय ग्रंथाचे साफल्य त्याची पूजाअर्चा होण्यात नसून तो ग्रंथ अभ्यासविषय आणि अभ्यासप्रेरक होण्यात आहे. हे जर खरे असेल. तर मी करणार आहे ती समीक्षा दामल्यांच्या ग्रंथाच्या सफलतेची निशाणी आहे.

मराठी व्याकरणावरचे म्हणण्यासारखे प्राचीनतम उपलब्ध पुस्तक – महानुभाव भीष्माचार्यांचे 'पंचवार्तिक' –तेराव्या-चौदाव्या शतकाइतके जुने असले, तरी मराठी व्याकरणाची **परंपरा** अशी एकोणिसाव्या शतकापासून – नक्की सांगावयाचे तर १८०५ पासून – विल्यम केरी आणि वैजनाथ पंडित नागपूरकर यांच्या पुस्तकापासून सुरू झाली, असे म्हणावयास हवे. मध्यंतरीच्या काळात सतराव्या-अठराव्या शतकांत फादर स्टीफन्सने

*दामले जन्मशताब्दीनिमित्त महाराष्ट्र-साहित्य-परिषदेत दि. ७-११-१९६८-ला झालेले व्याख्यान.

आणि अन्य काही मिशनऱ्यांनी लिहिलेली कोकणीची व्याकरणे उपलब्ध आहेत. व्यापक अर्थाने ती मराठीचीच व्याकरणे होत. तथापि ती विशिष्ट बोलीशी निगडित आहेत, हे एक; आणि त्यांचा पुढे झालेल्या प्रमाण-मराठीच्या – म्हणजे बहुतेकांनी नमूद केल्याप्रमाणे पुणे-प्रांती प्रचलित असलेल्या मराठीच्या – व्याकरणांवर प्रभाव असा पडलेला नाही, हे दुसरे. या कारणांसाठी मराठी व्याकरणाच्या परंपरेचा आरंभ स्थूलमानाने केरीपासून मानावा लागतो. मराठीच्या माहेरापासून दूर अशा पूर्वेकडे बंगालमधल्या श्रीरामपूर या ठिकाणी मराठी व्याकरणाच्या परंपरेतले हे पहिले व्याकरण निर्माण व्हावे, हा योगायोग त्याची ऐतिहासिक कारणे सांगता येण्यासारखी असली तरी विलक्षण वाटतो. असाच दुसरा विलक्षण योगायोग जुळून येऊन दूर दक्षिणेकडे मद्रास शहरी १८२७-च्या सुमाराला मराठीचे संस्कृत भाषेतले एकमेव व्याकरण – वेंकटमाधवाचे 'महाराष्ट्रप्रयोग-चन्द्रिका' हे - रचले गेले. ही दोन्ही व्याकरणे इतिहास-दृष्ट्या महत्त्वाची असली, तरी परंपरा निर्माण करण्यास असमर्थ ठरली. परंपरानिर्मितीचे श्रेय निःशंकपणे ज्याला द्यावयास हरकत नाही, असे मराठीच्या माहेरी जन्मलेले पहिले व्याकरण म्हणजे मुंबईच्या 'नेटिव एज्युकेशन सोसायटी'च्या 'कारखान्यां'त 'जार्ज जारवीस' साहेबाने नेमलेल्या पंडितांपैकी जगन्नाथशास्त्री क्रमवंत, गंगाधर-शास्त्री फडके आणि बाळशास्त्री घगवे या तिघा पंडितांनी 'संस्कृत व्याकरणाध्ययनवलेंकरून' १८२५-च्या सुमारास रचलेले 'महाराष्ट्र भाषेचे व्याकरण' हे होय. मराठीचे व्याकरण मराठीतून रचण्याची जी परंपरा या व्याकरणाने सुरू केली, तिला पुढे दादोबा पांडुरंग, कृष्णशास्त्री चिपळूणकर, कृष्णशास्त्री गोडबोले, रामचंद्र भिकाजी गुंजीकर, रावजीशास्त्री गोडबोले, मोरो केशव दामले, विश्वनाथ काशीनाथ राजवाडे, नारायण विठ्ठल आपटे, गोविंद कृष्ण मोडक, महादेव पांडुरंग सबनीस, अरविंद मंगरूळकर इत्यादी वैयाकरणांनी भूषित केले. या परंपरेला जवळजवळ समांतर अशी जी मराठीच्या इंग्रजी व्याकरणांची परंपरा केरीपासून सुरू झाली, तीतही जे. स्टीव्हन्सन, इबेंझर बर्जिस, गणपतराव नवलकर, आप्पाजी काशिनाथ खेर, नारायण गोविंद कालेलकर इत्यादींनी नाव घेण्यासारखे काम केले आहे. या व्यतिरिक्त 'लँग्वेज कोर्स' या स्वरूपाची अप्रत्यक्षपणे, कमीअधिक प्रमाणात व्याकरणाच्या कक्षेत मोडणारी एडवर्ड फेअरबँक, एच. एम. लँबर्ट, नरेश कवडी आणि फ्रँकलिन साउथवर्थ, इत्यादींची पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत; तीही या इंग्रजी परंपरेत गणावयास हरकत नाही.

अशा केरी ते कालेलकर या सुमारे दीडशे वर्षांच्या मराठी व्याकरणाच्या परंपरेत मोरो केशव दामल्यांचे स्थान अनेक दृष्टींनी वैशिष्ट्यपूर्ण आहे. कालदृष्टीने दामल्यांचे व्याकरण मराठी व्याकरणपरंपरेच्या जन्म-शताब्दीच्या जवळपास येते. झालेल्या कामाचा आढावा घ्यावयास शंभर वर्षे हा सोयीचा टप्पा आहे. तसा आढावा दामल्यांनी आपल्या ग्रंथात घेतलाही आहे. हा आढावा अपूर्ण आहे. कारण स्टीव्हन्सन, बर्जिस या दखल घेण्यासारख्या वैयाकरणांची माहिती दामल्यांना असल्याचे दिसत नाही; क्रमवंत–फडके–घगवे यांचे व्याकरण तर दादोबांच्या काळातच दुर्मिळ आणि विस्मृतप्राय होऊन गेले होते. तथापि दामल्यांना ज्यांची माहिती आहे, त्यांची उपेक्षा त्यांनी केलेली नाही. आपल्या पूर्वीच्या व्याकरणग्रंथांतून मांडली गेलेली सर्व सामग्री दामल्यांनी आपल्या ग्रंथात वर्गीकृत करून एकत्र दिली; आणि मराठी व्याकरणातल्या विवाद्य प्रश्नांची सांगोपांग चर्चा करून उपलब्ध प्रमाणांच्या आधाराने निर्णय केले. सारांश, सामग्री, नियम आणि चर्चा, म्हणजेच दामल्यांच्या शब्दांत 'उद्घाटन आणि ऊहापोह', हे सर्व एकत्र मांडणारा ग्रंथ दामल्यांनी लिहिला. हा ग्रंथ आजपर्यंत मराठी व्याकरणावर लिहिल्या गेलेल्या ग्रंथांत सर्वांहून अधिक विस्ताराचा, म्हणजे डेमी आकाराच्या जवळजवळ एक हजार पृष्ठांचा आहे. या स्वरूपाचे आणि या प्रमाणावर कार्य मराठी व्याकरणावर दामल्यांच्यापूर्वी कोणी केलेले नाही; आणि दामल्यांच्या नंतरही आजपर्यंत झालेले नाही. स्थूल अर्थाने मराठी व्याकरणाचे हे 'महाभारत' आहे. 'यदिहास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न तत् क्वचित्', ही महाभारताची प्रौढोक्ती ज्या मर्यादेने महाभारताला, त्या मर्यादेने दामल्यांच्या व्याकरणालाही उपपन्न होते.

'सर्वेषां कविमुख्यानामुपजीव्यो भविष्यति।
पर्जन्य इव भूतानामक्षयो भारतद्रुमः॥'

असे खुद्द महाभारतातच म्हटले आहे, त्याप्रमाणे महाभारत हे पुढच्या संस्कृत साहित्याला ज्या प्रमाणात आधारभूत ठरले, त्या प्रमाणात दामल्यांचे व्याकरणही पुढच्या व्याकरणांना आधारभूत ठरले, – ज्यांना

दामल्यांची मते मान्य नाहीत, त्यांनाही उपयोगी ठरले. कारण दामल्यांचे व्याकरण हा एक प्रचंड संदर्भग्रंथ आहे. इतकी उदाहरणे, इतके शब्द, इतके नमुने व्यवस्थित गटवारीने एकत्र उपलब्ध करून देणे हेही व्याकरणाच्या क्षेत्रात लहानसहान काम नव्हे. दामल्यांनी तर विविध उपपत्तीही एकत्र संकलित करून, चिकित्सा-चर्चा करून व्याकरणविषयक प्रश्नांची बारीक-सारीक अंगेही दृष्टीपुढे आणली आहेत. दामल्यांच्या व्याकरणाचे हिंदी व्याकरणावरही ऋण आहे. ' हिंदी व्याकरण ' या हिंदीत मान्यता पावलेल्या ग्रंथाचे कर्ते स्व. पं. कामताप्रसाद गुरू यांनी आपल्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत दामल्यांच्या व्याकरणाविषयी लिहिले आहे – ' सबसे अधिक सहायता मुझे दामले-कृत " शास्त्रीय मराठी व्याकरण " से मिली है जिनकी शैली पर मैंने अधिकांश में अपना व्याकरण लिखा है। पूर्वोक्त पुस्तक से मैंने कई एक वर्गीकरण, विवेचन, नियम और न्याय-संमत लक्षण, आवश्यक परिवर्तन के साथ, लिये हैं। संस्कृत-व्याकरण के कुछ उदाहरण भी मैंने इस पुस्तक से संग्रह किये हैं। ...इन पुस्तकों के लेखकों के प्रति मैं नम्रतापूर्वक, अपनी हार्दिक कृतज्ञता प्रकट करता हूँ।' [ हिंदी व्याकरण ०१–०२ ]

एकंदरीने, दामल्यांनी व्याकरणाच्या क्षेत्रात अभूतपूर्व कार्य केले आहे. ते अजूनही अद्वितीय राहिले आहे; कारण या स्वरूपाचा, या पल्ल्याचा, या उपयुक्ततेचा, थोडक्यात म्हणजे या आकार-अधिकार-उपकारांचा ग्रंथ दामल्यांच्यानंतर अजून निर्माण झालेला नाही. यावरून अशा स्वरूपाच्या कार्याचा अवघडपणा पुन्हा एकदा प्रत्ययाला येतो. असा ग्रंथ यापुढे झाला, तर त्याची प्रत्यक्षाप्रत्यक्ष प्रेरणा दामल्यांच्या या ग्रंथातच असल्याचे आढळून येईल. या थोर कार्याबद्दल मी मराठी व्याकरणाचा एक अभ्यासक या नात्याने दिवंगत मोरो केशव दामल्यांच्या प्रेरक स्मृतीला आदराने अभिवादन करतो. मराठी व्याकरणाच्या या द्रोणाचार्यांच्या चरणापाशी हा अर्जुनाचा अभिवादनाचा बाण विनीत भावाने उपस्थित झाला आहे. पुढे संग्राम आहेच. शास्त्र आणि शस्त्र यांना संग्राम कधी चुकला आहे? शास्त्र आणि संग्राम यांचा इतका अव्यभिचारी संबंध आहे, की शास्त्री माणूस शास्त्राबाहेर पडून राजकारणात गेला, तर तेथेही संग्राम करून जरब बसवितो. याची खात्री जरूर पडल्यास फील्ड मार्शल अयूबखाँ पटवतील.

दामल्यांची व्याकरणविषयक मते ज्यांना मान्य नाहीत, त्यांनीही त्यांच्या व्याकरणातील अन्य गुणांबद्दल त्यांना धन्यवाद दिले आहेत. पैकी एक गुण म्हणजे दामल्यांची विषयप्रथक्करणाची हातोटी, आणि दुसरा, त्यांनी मराठी व्याकरणपरंपरेतील पूर्वसूरींच्या मतांचा घेतलेला चिकित्सापूर्ण आढावा. यांपैकी पहिल्या गुणाची पावती ' महाराष्ट्रीय ज्ञानकोशा 'ने अप्रत्यक्षपणे आणि मोघम शब्दांत दिली आहे : ' केवळ तार्किक दृष्ट्या शब्दांची परस्परसंगती पाहणारा आणि मराठी व्याकरणाचा शास्त्रीय दृष्टीने अभ्यास करणारा लेखक म्हटला म्हणजे मोरोपंत दामले हा होय. " [ प्रस्तावना खंड, विभाग पाचवा, पृष्ठ २१५ ] दामल्यांचा ग्रंथ ' व्याकरणशास्त्र ' या नावाला सर्वथा नालायक ठरवणारे राजवाडेही एका ठिकाणी म्हणतात : ' उदाहरणांचे पृथक्करण दामले इतके नामी करतात की, सत्याच्या जवळ जवळ येऊन ते सदा ठेपतात. ते जर व्युत्पत्तीची मदत घेते, तर साक्षात सत्यच त्यांच्या हातून नमूद झाले असते. ' [ राज / मु १७ ] ' साधकबाधक प्रमाणे पाहून निर्णय करण्याची हातोटी दामल्यांना बरीच चांगली अवगत आहे. आणि ह्या एका गुणाच्या जोरावर त्यांनी मराठी भाषेचे व्याकरण लिहिण्यास कंबर बांधली आहे. ' [ राज / मु ८८ ] अन्यत्र ते म्हणतात : ' ही संशोधनात्मक टीका करताना दामल्यांच्या व्याकरणाचा मला फार उपयोग झाला. संशय स्थले व अनिश्चित स्थले व विकट जागा मराठी व्याकरणात कोणत्या आहेत व तत्संबंधाने पूर्ववैयाकरण काय म्हणतात व दामल्यांचे स्वतःचे काय म्हणणे आहे, ते एका ठिकाणी आयते संगृहीत केलेले मला सापडले व ते पद्धतशीर रीतीने मांडिलेले सापडले. एतदर्थ दामल्यांचा मी अत्यंत ऋणी आहे. ' [ राज / मु ८७ ] दामल्यांच्या या योग्यतेची जाणीव असल्यामुळे राजवाड्यांनी ' सुबंतविचारा 'च्या अंती दामल्यांना आपल्या उणिवांची भरपाई करून पुनः एकदा व्याकरण लिहिण्याची सूचना केली आहे. ' तात्पर्य, विद्यमान मराठी भाषेचे व्याकरण शास्त्रीय पद्धतीने लिहिण्याचा दामल्यांचा प्रयत्न राष्ट्राच्या प्रगतीस अत्यंत पोषक आहे. इतकेच की हा प्रयत्न अनेक दोषांनी अथपासून इतिपर्यंत ग्रस्त आहे. सबब, प्रो. दामल्यांनी मराठी व्याकरणशास्त्र रचण्याकडे आपली कुशाग्र व व्यापक बुद्धी पुनः एकवार लावावी.' [ राज / मु ९० ] सबनीसही लिहितात :

' गुंजीकरांच्या विधायक साहाय्यापेक्षा कितीतरी अधिक प्रमाणात दामल्यांचे विरोधी कार्य आम्हांस उपकारक झाले आहे ही गोष्ट अत्यंत कृतज्ञतापूर्वक येथे नमूद करणे हे आम्ही आमचे कर्तव्य समजतो... दादोबा, गोडबोले, जोशी, खेर इत्यादिकांची मते आम्हांला दामल्यांच्या व्याकरणाच्या द्वारेच कळली. त्यांनी परस्परच यांपैकी चुकीच्या मतांचा निरास केला होता...' [ सव ४९ ]

दामल्यांच्या व्याकरणातील या गुणांचा काहीसा तपशिलाने परामर्श करणे उपयुक्त होईल. दामल्यांना मुळात शास्त्राची जाण चांगली आहे, हे त्यांनी आपल्या ग्रंथात अनेक ठिकाणी प्रत्ययाला आणून दिले आहे. शास्त्राचा व्यवहार लक्षणमुखाने चालतो, शास्त्रीय लक्षणात लक्ष्य पद गुंतलेले असता कामा नये, त्यांत लक्ष्य पदार्थांची जाती आणि असाधारण धर्म यावे लागतात, अर्थात जो पदार्थ एकच आहे तो लक्षणक्षम असत नाही,लक्षण अव्याप्त्यादी दोषांपासून मुक्त असावे लागते; शास्त्रात अपुरी विधाने क्षम्य नाहीत, शास्त्रीय ग्रंथात वापरल्या जाणाऱ्या भाषेकडे कधीच दुर्लक्ष करता कामा नये; भेदोपभेदांना एकाच पंक्तीत बसविणे, अपवादांस नियमांचे बंधन घालणे, बहुमताने निर्णय करणे, इत्यादी गोष्टी अशास्त्र आहेत, सत्याला ( आणि परंपरेने शास्त्राला )कोणाची भीडमर्यादा नसते;–याप्रमाणे त्यांनी आपल्या व्याकरणात जागोजाग शास्त्राला कौल लावला आहे. त्यांचा हा शास्त्रपक्षपात त्यांनी आपल्या ग्रंथाला दिलेल्या ' शास्त्रीय ( व्याकरण )' या नावातही व्यक्त होतो, आणि त्यातून अप्रत्यक्षपणे इतरांच्या व्याकरणांची अशास्त्रीयता सूचित करण्याचा त्यांचा हेतूही जाणवतो. ज्ञानदेवांच्या ' भावार्थदीपिके 'बद्दल नापसंती व्यक्त करण्यासाठी वामनपंडिताने आपल्या गीताव्याख्येला ' यथार्थदीपिका ' हे नाव दिले म्हणतात; तसाच हा प्रकार आहे. या ' शास्त्रीय ' नावाला जागण्यासाठी दामल्यांनी न्यायशास्त्राचा ' धारवाडी काटा ' सदैव जवळ बाळगिला आहे; आणि त्याच्या साक्षीने पूर्वसूरींना अपुऱ्या सामग्रीच्या आधाराने निष्कर्ष – ' अवलोकनात्मक विगमन ' – काढिल्याबद्दल आणि ' न्यायशास्त्राचा खून ' केल्याबद्दल ठपकाही दिला आहे.

या शास्त्रविषयक पक्षपाताला प्रायः अनुरूप अशीच भूमिका त्यांनी व्याकरण आणि वैयाकरण यांच्या बाबतीत स्वीकारिलेली आहे. व्याकरणाचा मूलाधार आणि परम प्रमाण शिष्टप्रयोगात्मक भाषा ही होत; – ' प्रयोगशरणाः वैयाकरणाः '. [ दाम / १ : २९४ ] शिष्टसांप्रदायात असलेल्या प्रयोगावर ग्राह्याग्राह्यतेचा छाप मारण्याचा अधिकार वैयाकरणाला नाही; हा ' धंदा ' वैयाकरणाच्या कर्तव्याच्या मर्यादेबाहेरचा आहे. ' तो अधिकार बळेच बळकावून गाजवू ... लागल्यामुळे तुमचेच हसे होत आहे, ' [ पृ ३१४–१५ ] असे ते वैयाकरणांना बजावतात. वैयाकरणांचे काम इतकेच की, शिष्टप्रचाराची नोंद करून स्वस्थ बसावयाचे; फार तर इतके सांगावे की, अमुक रूपाचा प्रचार शिष्ट भाषेत कमी किंवा जास्त आहे. वैयाकरणाच्या या कर्तव्याचे उल्लंघन करून शिष्टप्रयोगातील रूपांविषयी शुद्धाशुद्धतेची चर्चा करणाऱ्या दादोबादिकांना त्यांनी अनेक स्थळी बोल लाविला आहे; आणि त्यांच्या मताविरुद्ध ' मी आंघोळ केली ', ' तू मला लेखणी दिलीस ' इत्यादी संकरप्रयोगांना मान्यता देऊन त्यांपैकी काहींना संस्कृत प्रयोगांचा आधारही (' त्वं मे लेखनीं दत्तवान् ') [ पृ ७८३ ] शोधून दिला आहे. ( यावद्दल त्यांना ' संकराचार्य ' ही पदवी देण्यास हरकत नाही ! ) या उलट, याच शिष्टप्रयोगाला कौल लावून ' असत, असतो ' हे ' व्याकरणग्रंथांशिवाय इतर कोठेही ' न आढळणारे ' वैयाकरणप्रणीत ' रूप अमान्य केले आहे. [ पृ ६९८ ] व्याकरणाच्या कार्यकक्षेविषयी दामल्यांनी आपली कल्पना एकदोन ठिकाणी स्पष्ट नमूद केली आहे. एखाद्या भाषेचे ऐतिहासिक व्याकरण आणि प्रचलित भाषेचे व्याकरण यांच्या कक्षा भिन्न असल्याचे ते निदर्शनास आणितात; आणि सांगतात की, ' एका भाषेचा अन्य भाषांशी जो संबंध असतो तो व्याकरणाचा विषय होऊ शकत नाही. तर व्याकरणाची दृष्टी फक्त त्या एकाच भाषेपुरती मर्यादित असते. ' [ पृ ४७० ] मग ' अन्य भाषांशी संबंध ' हा विषय कोणाचा ? ' अन्य भाषेतून आपल्या भाषेत शब्द कसे येतात, ... हे सांगणे कोशाचे काम आहे; व्याकरणाचे नाही. ' म्हणजे, भाषेच्या ऐतिहासिक आणि तुलनात्मक अध्ययनापेक्षा वर्णनात्मक अध्ययन वेगळे आहे, याची जाणीव दामल्यांना आहे. आणि दामल्यांना याचीही जाणीव आहे की, व्याकरणातील विविध उपपत्ती ' हा प्रश्न सत्यासत्याचा नसून केवळ बऱ्यावाईट व्यवस्थेचा आहे. ' व्याकरणातील उत्तम व्यवस्था ती, की जिच्यात बहुसंख्य प्रयोगांची सुखाने संगती लागते.

दामल्यांनी याप्रमाणे ग्रंथात ठिकठिकाणी शास्त्रीय पद्धतीची जाण दाखविली असली आणि पूर्ववैयाकरणांना अशास्त्रीय प्रतिपादनाबद्दल दोष दिला असला, तरी स्वतःसुद्धा प्रारंभापासून अखेरपर्यंत अगणित ठिकाणी कळत न-कळत अशास्त्रीयतेचाच मार्ग चोखाळला आहे. 'शास्त्रीय' व्याकरण रचण्याची प्रतिज्ञा करणारे दामले जेव्हा 'शास्त्राद्रूढिर्बलीयसी' असे जाहीर करीत म्हणू लागतात की, 'शास्त्र जरी झाले तरी त्यास रूढीस सर्वच बी धाब्यावर बसविता येत नाही' [पृ २१], एवढेच नव्हे, तर क्वचित् शास्त्रीय फरक 'महत्वाचा नाही' असे सांगतात, एखादा नियम 'त्रासदायक' असल्याच्या सबबीवर बाजूला सारतात आणि 'सोईसाठी साधारण नियम' बांधू लागतात, 'सूक्ष्मता बाजूस ठेवून... स्थूल दृष्टीच स्वीकारणे प्रशस्त' [पृ ८८८] ठरवू लागतात, व्याकरण आणि न्यायशास्त्र यांमध्ये 'तडजोड' [पृ ८८३] करून वाक्यपृथक्करणाची शंभर पाने बसवू लागतात (पन्नास 'पाने' कायद्याला धरून आहेत!), व्याकरणासाठी न्यायशास्त्राकडून 'सवलत' घेऊ लागतात, स्वरूपदृष्ट्या निघणारा निष्कर्ष बाजूला सारून 'अर्थदृष्ट्या' निघणारा निष्कर्ष जवळ करितात, व्याकरणाला मार्गदर्शकत्वाचाही अधिकार देऊ लागतात [पृ ६], वैयाकरणांचे शिष्टप्रचाराविषयीचे शुद्धाशुद्ध, प्रशस्ताप्रशस्त या स्वरूपाचे शेरे अस्थानी नाहीत असे म्हणू लागतात [पृ ४६६] आणि स्वतःही तसे शेरे देऊ लागतात, एखादा प्रयोग रूढ असूनही करण्याची 'जरूर नसल्या'चे सांगतात, शास्त्रीय मुद्द्याचा निर्णय बहुमतानुसार करण्याची पद्धती स्वतःला मान्य नसल्याचे सांगूनही [पृ ६१९] पुढे हा निर्णय बहुमतानुसार करण्याचा घाट घालतात [पृ ६२०], शास्त्रातला घोटाळा दूर करण्यासाठी 'पाचांमुखी' असलेल्या परमेश्वराला शरण जातात [पृ ७३२], एखादी संज्ञा कोणाला 'आवडत नसल्यास' दुसरी संज्ञा उपयोजिण्यास अनुज्ञा देतात, विशिष्ट नियम आणि अपवाद 'अप्रयोजक' असल्याचे जाणत असूनही 'वैयाकरणाचे चालीस अनुसरून' नमूद करितात [पृ २७५], – हे आणि असले प्रकार जेव्हा दामले करू लागतात, तेव्हा वाटते की, आपल्याच प्रतिपादनावर आपणच बोळा फिरविणारे दामले एक तर विसराळू असले पाहिजेत, नाही तर हे प्रकार चालवून घेणारे त्यांचे 'शास्त्र' तरी मुलखावेगळे असले पाहिजे!

दामल्यांच्या व्याकरणाचे टीकाकार मुख्यतः दोन: राजवाडे आणि सवनीस. राजवाड्यांनी दामल्यांच्या व्याकरणाचे परीक्षण 'निरुक्तविचार' आणि 'मुक्तविचार' या दोन निबंधांमध्ये १९१२ साली, आणि सवनिसांनी 'आधुनिक मराठीचे उच्चतर व्याकरण' या ग्रंथात १९५१ साली केले आहे. यांपैकी राजवाड्यांनी केलेले परीक्षण दामल्यांच्या पाहण्यात आले होते. त्याला ते काही उत्तरही देणार होते (असे त्यांचे चिरंजीव लिहितात); पण त्यापूर्वीच त्यांच्यावर मृत्यूने झडप घातली. सवनिसांचे परीक्षण दामल्यांच्या दृष्टीला येणेच शक्य नव्हते. या दोघांचेही देणे दामल्यांच्या वतीने त्यांच्या पदरात टाकण्याचे काम आता मला करावयाचे आहे.

आपणाला एक गंमत सांगतो. राजवाड्यांनी परीक्षणाच्या उपन्यासात निर्देश केला आहे, तो 'रा. रा. मोरो कृष्ण दामले' यांच्या 'शास्त्रीय मराठी व्याकरणा'चा केला आहे. [राज, नि १०] सवनिसांनी या बाबतीत त्यांचाच कित्ता गिरविला आहे. [सव ४] 'मराठीका वर्णनात्मक व्याकरण' या पुस्तकात तर 'स्वर्गीय श्री. केशव दामलेका' 'मराठी शास्त्रीय व्याकरण' [पृ. ८४] आले आहे! हजार-पाचशे वर्षांनंतर हे मजकूर त्या वेळचे कोणी तरी राजवाडे वाचतील, आणि विचारतील: 'व्याकरणकार दामले एक की दोन? कृष्णाजीपंत हे दामल्यांचे वडील की भाऊ? शास्त्रीय मराठी व्याकरण मोरो केशवांच्या वडिलांनी लिहिले काय? का केशव हे मोरोंचेच टोपणनाव? दामल्यांचे व्याकरण 'शास्त्रीय मराठी' की 'मराठी शास्त्रीय'? शास्त्रीय मराठी व्याकरण एक की दोन की तीन?' अशा रीतीने सवनिसांच्या, 'जोगलेकरां'च्या सहकार्याने राजवाड्यांनी – अजाणता असे म्हणणे त्यांच्या बाबतीत साहसाचे होईल – भविष्यकालीन राजवाड्यांसाठी संशोधनाला भरपूर अवसर निर्माण करून ठेविला आहे!

राजवाड्यांनी दामल्यांवर जे मुख्य आक्षेप घेतले आहेत, ते त्यांची शिवीगाळ गाळून असे सांगता येतील:

मराठीचे व्याकरण रचिता येण्यासाठी राजवाड्यांच्या मते वैयाकरणाची काही मूलभूत तयारी असावयास हवी. 'व्याचिकीर्षु हा शब्देतिहासज्ञ नैरुक्त हवा.' [राज, नि २९] म्हणजे भाषेतील शब्द त्यांच्या मूळ रूपांतून कसकसे बदलत वर्तमान रूपांपर्यंत पोचले हे–

म्हणजे, सर्व शब्दांची व्युत्पत्ती, गणगोत – त्याला माहीत असावयास हवे. हे माहीत होण्यासाठी त्याला वैदिक, संस्कृत, प्राकृत आणि जुने मराठी यांचे व्याकरणशास्त्र अवगत असावयास हवे. दामल्यांना यातले काहीही येत नाही. [ राज/ ति २९ ]

या तयारीनंतर मराठी शब्दांचे समग्र अवलोकन आणि वर्गण (=वर्गीकरण ) ही अवस्था येते. हे काम दामल्यांना मुळीच साधलेले नाही; किंबहुना, मराठी भाषेचे पूर्ण अवलोकनच अद्याप झालेले नसल्यामुळे वर्गण आणि नियमपरंपरा यांची अद्याप वेळच आलेली नाही. [ राज/ सु ७९ ]

वर्गणानंतर नियम – शास्त्र – बांधण्याची अवस्था येते. ‘ शास्त्र म्हणजे सामान्य सिद्धान्तांची परंपरा.... प्रथम अत्यंत सामान्य कार्यांचा शोध करावयाचा, नंतर त्याहून कमी सामान्य कार्यांचा...; आणि शेवटी सर्वाहून कमी व्यापक अशा सामान्य कार्यांचा ... आणि सरते-शेवटी जेथे सामान्य कार्य सापडत नाही, तेथे निपात करावयाचा.... ह्या पाणिनीय धर्तीवरच मराठी व्याकरण-शास्त्राची इमारत उभारली पाहिजे. ’ [राज/ सु ७८–९] या दृष्टीने राजवाड्यांच्या मते पाणिनीची अष्टाध्यायी हाच शास्त्रग्रंथ आहे, भट्टोजी दीक्षितांची सिद्धान्तकौमुदी हा शास्त्रग्रंथ नाही, कलाग्रंथ आहे. दामल्यांनी आपला ग्रंथ कौमुदीच्या धर्तीवर रचिला आहे. तेव्हा ‘ शास्त्र-सरणीसंबंधाने... व्याकरणशास्त्रात दामले कोठेच नाहीत. उत्सर्ग व अपवाद कसे रचावे ह्यांचे स्वप्नही दामल्यांना नाही. ’ [ राज/ सु ७८ ] ‘ बहुतेक नियमांना काही हा शब्द जोडलेला दामल्यांच्या ग्रंथात हमेश आढळतो. नियम म्हणजे निश्चित वस्तूसंबंधाने निश्चित विधान करणे. दामल्यांचे सर्व नियम अनिश्चित वस्तूसंबंधाचे आहेत. ह्यांना नियम हा शब्द कोणत्या न्यायशास्त्राच्या कोणत्या परिभाषाप्रकरणात सांगितला आहे ? ’ [ राज/ ति ३१ ]

या आक्षेपांचा आता क्रमशः विचार करावयाचा आहे. ऐतिहासिक व्युत्पत्ती हे शब्दांच्या वर्गीकरणाचे यंत्र आहे, हे राजवाड्यांचे मत विवाद्य आहे. ‘घडा’ या शब्दाचे अथवा त्याच्या रूपांचे व्याकरण सांगता येण्यासाठी तो शब्द ‘घट’ या संस्कृत शब्दापासून ‘घड’ या प्राकृत रूपांतराच्या द्वारा आला आहे, या ज्ञानाची खरोखर काय आवश्यकता आहे ? हे ज्ञान असल्याने या शब्दाच्या व्याकरणात काय भर पडणार आहे ? किंवा नसल्याने काय न्यून राहणार आहे ? राजवाड्यांना हे मान्य आहे की, ‘ वर्तमान मराठी भाषेचे व्याकरण रचताना, त्यात शब्दांचा व प्रत्ययांचा व रूपांचा इतिहास देणे अप्रस्तुत आहे. ’ तरी त्यांचे म्हणणे आहे की, ‘ वैयाकरणाने तो जाणणे अत्यंत आवश्यक आहे. ’ [ राज / ति ३८-९ ] जे व्याकरणात अप्रस्तुत आहे, तेही वैयाकरणाने जाणणे आवश्यक असेल, तर आणखी बऱ्याच अप्रस्तुत विषयांचे ज्ञान त्याला आवश्यक का मानू नये ? कवीला काय-काय माहीत हवे, हे सांगताना भामह म्हणतो :

‘ न स शब्दो न तद्वाच्यं न सा विद्या न सा कला।
जायते यन्न काव्याङ्गम्, अहो भारो महान् कवेः !॥ ’

असे वैयाकरणाच्या बाबतीत म्हणण्याचा प्रसंग राजवाड्यांनी आणला आहे ! वैयाकरणाला सर्व काही माहीत असले पाहिजे, – गणित, पदार्थविज्ञान, रसायन, ज्योतिष, कामशास्त्र, वैद्यक, गायनेकॉलॉजी, केरॅटोप्लास्टी, प्लॅस्टिक सर्जरी,... माती आणि मसण ! का नको ? या विषयांच्या अध्ययनाने झालेला बुद्धिविकास काय त्याला व्याकरणात उपयोगी पडणार नाही ? मुद्दा असा आहे की, उपयोगी पडणे वेगळे, आणि आवश्यक असणे वेगळे. हा विवेक करून लक्ष्यभूत कार्याचे कारण – म्हणजे ‘कार्य-नियतपूर्ववृत्ती ’ – काय आहे, ‘अन्यथासिद्ध’ काय आहे, ‘ यदृच्छापूर्ववृत्ती ’ काय आहे, हे निर्धारित केले पाहिजे. या दृष्टीने पाहता मराठीचे व्याकरण रचिता येण्यासाठी फक्त मराठीचे पूर्ण ज्ञान हे असाधारण कारण, आणि शास्त्रपद्धतीचे ज्ञान हे साधारण कारण, – एवढीच आवश्यक म्हणून सांगता येतील. राजवाड्यांचा ‘ वैयाकरणसूर्य ’ जो पाणिनी, त्याला तरी संस्कृतपूर्व सर्व अवस्थांचे पूर्ण ज्ञान होते, – म्हणजे यूरोभारतीय भाषावस्था माहीत होती, अवेस्ताची भाषा येत होती, ग्रीक-लॅटिन भाषा अवगत होत्या, लिथुआनियन भाषा कळत होती, याला काय प्रमाण आहे ? त्याला वेदभाषा येत होती, एवढे मान्य होईल. ( तीही पूर्ण येत होती की नाही, याविषयी पुष्कळांना शंका आहे. ) पण त्यामुळे त्याच्या संस्कृताच्या विवरणात काय भर पडली ? ‘ गन्तुम्, गन्तवे, गन्तोः ’ इत्यादी मुखवट्यांची रूपे वेदात आलेली पाहून त्याला त्यातली ‘ गन्तु ’ ही प्रकृती आणि पुढे लागलेले विभक्तिप्रत्यय नक्कीच ओळखू आले असतील. तरी तो संस्कृतात ‘ गन्तुम् ’ हे ‘ गन्तु ’चे

द्वितीया एकवचनाचे रूप म्हणून न सांगता 'तुम्'-प्रत्ययान्त अव्यय म्हणून सांगतो, ते काय उगाच? आता पुढे प्रश्न असा की, 'गन्तुम्' हे शेवटी तुमन्त अव्यय म्हणूनच जर सांगावयाचे असेल, तर त्यासाठी वेदातले 'गन्तु' हे नाम माहीत असून-नसून काय फरक पडणार आहे? तेव्हा वैयाकरणाला ऐतिहासिक व्युत्पत्तीचे ज्ञान आवश्यक म्हणता येणार नाही. कदाचित् हे ज्ञान त्याच्या व्याकरणकार्यात विघ्नभूतही ठरेल. तसे ते राजवाड्यांच्या बाबतीत ठरले आहे. प्रसिद्ध भाषाभिज्ञ ब्लूमफील्ड म्हणतो :

'In order to describe a language, one needs no historical knowledge whatever; in fact, the observer who allows such knowledge to affect his description, is bound to distort his data.' [ LANGUAGE, p. 19–20 ]

ब्लूमफील्डने दाखविलेला हा धोका राजवाड्यांनी आपल्या व्याकरणविषयक उपपत्तींनी प्रत्यक्षात उतरवून दाखविला आहे. उदाहरणार्थ : 'रामाने मुलगीला मारिली' म्हणजे त्यांच्या मते 'रामाने मुलगी लामारिली.' [ राज/मु १६ ] असली विलक्षण उपपत्ती सांगून राजवाड्यांनी व्युत्पत्तिज्ञान (तेही येथे खरे नाही) व्याकरणाला मारक असल्याचेच सिद्ध केले आहे. या उदाहरणातला पदक्रम बदलल्यावर जे वाक्य बोलण्यात येते, — समजा, 'मुलीला रामाने मारिली' — ते पाहताच 'लामारिली' हे एक पद असल्याचा राजवाड्यांचा स्वैर व्युत्पत्तीवर आधारलेला दावा किती फुसका आहे, ते तत्काळ कळून येते. राजवाड्यांच्या या आक्षेपाचे दामल्यांना आधीच स्वप्न पडले असावे. म्हणूनच त्यांनी 'व्युत्पत्ती' या प्रकरणात सुरवातीलाच सांगून टाकले की, एका भाषेतून दुसऱ्या भाषेत शब्द कसा आला, या स्वरूपाची व्युत्पत्ती व्याकरणात अप्रस्तुत आहे.

याप्रमाणे राजवाड्यांचे मूळ गृहीतच विवाद्य असल्यामुळे त्यांच्या आधारावर त्यांनी दामल्यांच्या वर्गणावर जे आक्षेप घेतले आहेत, आणि जी नवी वर्गणे सुचविली आहेत, त्यातला वारा निघून जातो. त्यांनी मांडिलेले स्वर-व्यंजनविभागाची अनावश्यकता, 'शेषकार्य' हा सर्वनामाचा निकष, मराठीत दोनच विभक्ती, 'संयुक्त क्रियापदा'ची अनावश्यकता, धातुपाठाची आवश्यकता इत्यादी मुद्दे मूलगामी आहेत, विचारणीय आहेत, यात शंका नाही. पण म्हणून त्यांनी केलेली सगळी उलथा-पालथ ग्राह्य ठरत नाही. त्यांनी सुचविलेल्या काही गोष्टी तर उघड-उघड भ्रममूलक आहेत. याचा अर्थ दामल्यांनी सांगितलेले सगळे बरोबर आहे, असा नाही. त्यांच्याही चुका झाल्या आहेत. पण राजवाड्यांच्या चुका त्यांच्याहून जास्त आहेत, मोठ्याही आहेत, — अगदी हिमालयन! 'Himalayan men make Himalayan blunders!' मोठ्यांच्या चुकाही मोठ्याच असाव्या लागतात! राजवाड्यांच्या काही व्युत्पत्त्यांना तर त्यांच्या कल्पनेखेरीज अन्य काही प्रमाण नाही. 'रामाने मुलीला मारिली' यात 'लामारिली' हे एक पद मानण्यास त्यांनी काहीही पुरावा दिलेला नाही. 'वाचणेस' हे 'वाचनीय'वरून कसे आले, विशेषतः 'य'-चा 'स' कसा झाला, याला त्यांच्याकडे काही पुरावा नाही. अशा या त्यांच्या व्युत्पत्त्याच डळमळीत राहिल्यावर त्यांच्या आधारावर उभी केलेली त्यांची 'अवलक्षणे' कशी ग्राह्य होतील? त्यांच्या व्युत्पत्त्या जेथे बरोबर असतील, तेथेसुद्धा 'अवलक्षण' त्यांच्यावर विसंबून ठेवणे बरोबर नाही, हे यापूर्वी सांगितलेच आहे.

राजवाड्यांनी दामल्यांच्या व्याकरणातील मांडणी-बद्दल जे म्हटले आहे, ते मात्र खरे आहे. दामल्यांनी बांधलेल्या नियमांत 'काही, प्रायः, बहुधा' इत्यादी शब्द 'हमेश' आढळतात. अशा मोघम विधानांना काटेकोरपणे 'नियम' म्हणता यावयाचे नाही, हे खरे आहे. यासाठी प्रत्येक शब्द तपासून, त्याची प्रवृत्ती पाहून त्याला योग्य गटात दाखल करणे आवश्यक आहे. हे काम फार मोठे आहे, आणि ते पूर्ण होईल अशी अवस्था येणे भाषेचा स्वभाव आणि व्याप्ती लक्षात घेता कठीण आहे. नुसती प्रमाणभाषा घेतली, तरी देशकालकृत, उद्योगव्यवसायकृत असे सर्व फरक निरपवादपणे नोंदवणे हे बिकट काम आहे. 'जोपर्यंत भाषेस स्थैर्य आले नाही तोपर्यंत व्याकरण संदिग्धच राहणार' असे म्हणून दामल्यांनी हीच अडचण मांडली आहे. राजवाड्यांच्या 'व्याकरणसूर्या'नेदेखील — म्हणजे पाणिनीने — 'बहुलम्' असे ठिकठिकाणी म्हणून या बारीकसारीक गोष्टींच्यापुढे आपण हात टेकल्याचीच कबुली दिली आहे. ही राजवाड्यांच्या 'शास्त्र'कल्पनेत बसत असेल, तर तितपत सवलत दामल्यांनाही यावयास हरकत नाही. यात पाणिनीच्या पंक्तीला दामल्यांना

वसविण्याचा हेतू नाही; भाषाभ्यासाचे क्षेत्र कसे अनंत आहे, हे दाखवावयाचे आहे. दामल्यांचा ग्रंथ सिद्धान्त-कौमुदीसारखा आहे, अष्टाध्यायीसारखा नाही, हेही खरे आहे. पण म्हणून तो शास्त्रग्रंथ नाही, हे मात्र खरे नाही. शास्त्रग्रंथांचे अनेक प्रकार असतात; शैलीही विविध असतात. राजवाडे म्हणतात, तशी बांधणी सूत्रशैलीच्या कार्यानुरोधी ग्रंथांची असते; चर्चात्मक शैलीच्या प्रकरणानुरोधी ग्रंथांची नसते. उपयोग या दोन्ही प्रकारच्या ग्रंथांचा असतो. राजवाडे म्हणतात तशी मांडणी ब्रह्मसूत्रे, मीमांसासूत्रे इत्यादी ग्रंथात ते ग्रंथ सूत्रशैलीचे असूनही आढळत नाही. ते सर्व ग्रंथ अशास्त्रीयच काय? विषयांच्या गटांमध्ये शब्द विभागून देणारा 'अमरकोश' हाच तेवढा कोश, वर्णानुक्रमाने शब्द देणारा कोश हा कोश नव्हे, तो शास्त्रीय नव्हे, असे म्हटले तर चालेल? ग्रंथाची मांडणी काय, अधिकारी-विषय-प्रयोजनांच्या अनुरोधाने आणि ग्रंथकाराच्या रुचीप्रमाणे बदलते. तेव्हा जी मांडणी करण्याचा दामल्यांचा हेतूच नव्हता, ती त्यांच्यावर बळाने लादून दोष देण्यात काय अर्थ आहे?

राजवाडयांनी 'तिङन्तविचारा'त एका ठिकाणी म्हटले आहे : 'अडाणी वैयाकरण व्याकरण लिहिण्याला व देशात त्या काली चिकित्सक तज्ज्ञ नसण्याला जर गाठ पडली, तर मोठे अनहित होते. ते कोणते, तर व्याकरणशास्त्राची प्रगती खुंटते. दादोबापासून दामल्यां-पर्यंत गेल्या पाऊणशे वर्षांत, असा काही प्रकार झाला की काय हे निर्भीडपणे सांगण्याचे काम एखाद्या भविष्यत् तज्ज्ञावरच सोपविणे बरे.' [ राज / ति ३९ ] राजवाडयांची ही अपेक्षा सर्वस्वी अनाठायी होऊ नये, म्हणून खुद्द राजवाड्यांनाच आरोपीच्या पिंजऱ्यात उभे करण्याची ही दुर्जनता पदरी घ्यावी लागली. राजवाडे मला त्याबद्दल क्षमा करतील, अशी आशा आहे.

हे दामल्यांवरील राजवाड्यांचे आक्षेप झाले. दामल्यांवर सवनिसांनी जे आक्षेप घेतले आहेत, त्यातला तपशिलाचा भाग वगळल्यास सवनिसांचा आक्षेप मुख्यतः असा की, दामल्यांनी आपल्या व्याकरणात व्याकरणबाह्य विषय फार आणले आहेत. त्यांच्या 'एक हजार पानांच्या पुस्तकातून व्युत्पत्तिशास्त्र, ध्वनिशास्त्र, छंदःशास्त्र, कोश, प्रबंधनशास्त्र यांसंबंधीच्या फाजील मजकुरावरील सात-आठशे पाने काढून टाकली, तर निव्वळ व्याकरणाविषयी शेदोनशे पाने राहतील की काय याची वानवाच आहे!' [ सव ४० ] वर निर्देशिलेले व्याकरणबाह्य विषय मराठी व्याकरणात संस्कृत व्याकरणातून आल्याची माहिती सवनीस देतात. 'कुंपणाने शेत खावे त्याप्रमाणे ह्या शास्त्रांचे व्याकरणावर आक्रमण झाले आहे...बिंदू कोणत्या शब्दावर असावा याची चर्चा व्याकरणात करण्याची मुळीच जरुरी नाही ...तसेच द्वितीया, तृतीया, षष्ठी इत्यादी विभक्तींचे प्रत्यय कसे झाले या चर्चेला व्याकरणात स्थान नाही. तो व्युत्पत्तिशास्त्राचा विषय आहे...या दृष्टीने पाहिले तर राजवाड्यांचे "ज्ञानेश्वरीचे व्याकरण" हा व्याकरण-ग्रंथ असे म्हणताच येणार नाही. तथापि ह्या ग्रंथाने व्याकरणविषयक वाङ्मयात एक महत्त्वाची भर पडली, असे दामले गंभीरपणाने सांगतात!' [ सव २५-२६ ] व्याकरणात ढीगभर उदाहरणे देणे हेही सवनिसांच्या मते अनावश्यक आहे. 'कोणतीही रूपे न देता व्याकरण लिहिता येईल'; कारण 'व्याकरणात रूपे नियम-सिद्धीसाठी असतात; रूपसिद्धीसाठी नियम नाहीत.' [ सव २१ ] आपल्या या मताशी इमान राखण्यासाठी सवनिसांनी आपल्या व्याकरणात अनेक ठिकाणी नियमांची उदाहरणे शोधण्याचे काम वाचकांवरच सोपविले आहे.

सवनिसांचा दुसरा मोठा आक्षेप असा आहे की, 'प्रयोगशरणाः वैयाकरणाः' हे तत्त्व दामल्यांनी चुकीच्या अभिप्रायाने स्वीकारून दादोबादी जुन्या वैयाकरणांवर अन्याय्य टीका केली. यातल्या 'प्रयोग' या शब्दाचा अर्थ सवनिसांच्या मते 'व्याकरणसिद्ध रचना' असा आहे; तो दामले वगैरे मंडळींनी 'usage' म्हणजे बोलण्याचा प्रचार असा चुकीचा घेतला. त्यामुळे 'त्याने मुलीस निजविली' असले दादोबादिकांनी अग्राह्य ठरविलेले व्याकरणदुष्ट प्रयोग त्यांनी ग्राह्य ठरविले. सवनिसांच्या मते येथे 'प्रयोग ( usage )' काहीही असो, व्याकरण सांगताना '"निजविले" हेच रूप धरून "भावे प्रयोग" म्हणून सांगावे.' [ सव ४८ ] 'बोलण्याचा प्रचार' अशा अर्थाने 'प्रयोग' शब्द घेतला, तरी 'प्रयोग शिष्टमान्य असला पाहिजे' अशी अट घालून सवनीस बजावतात की, 'प्रौढभाषेत लिहिताना दादोबांसारख्या भाषाशास्त्रज्ञ शिष्टांना संमत असलेले प्रयोगच स्वीकारणे योग्य होईल.' [ सव ४७ ] आणि 'शिष्ट' म्हणजे कोण? तर 'शिष्ट म्हणजे......

संस्कृत न्यायशास्त्रात ज्याला " आप्त " म्हणजे "यथार्थ वक्ता पुरुष " असे म्हटले आहे, तो होय. ' या धोरणाने सवनिसांनी असेही म्हटले आहे की, ' बोली ( म्हणजे बोलण्यातली भाषा ) ही व्याकरणापूर्वी असली, तरी खरी ( म्हणजे, अभिजातलिखित वाङ्मयातील ) भाषा व्याकरणानंतरच विकसित होते. ' [ सव ११ ] अर्थात या ' खऱ्या ' भाषेच्या बाबतीत व्याकरण हे धर्मशास्त्राप्रमाणे ' प्रभुसंमित उपदेश ' करणारे — म्हणजे Normative — शास्त्र होय. ते ' अस्ति 'मुख नाही, तर ' अस्तु 'मुख आहे ; वर्तमानकाळी नाही, आज्ञार्थी आहे.

सवनिसांच्या मते दामल्यांनी आपला ग्रंथ रचिताना पाणिन्यादी व्याकरणकारांची सूत्रपद्धती न अनुसरता मरे, बेन, हॉवर्ड इत्यादिकांच्या व्याकरणातून आढळणारी विवेचन, ऊहापोह, व्याख्या, वर्गीकरण इत्यादी विशेषांनी युक्त अशी आधुनिक तर्काधिष्ठित पाश्चात्त्य पद्धती अनुसरली, हे चांगलेच झाले. पण असे करूनही त्यांनी संस्कृत व्याकरणातील ' लट्, लिङ्, लुङ्चे आधुनिक अवतार लाख्यात, ताख्यात इत्यादी जणू काय अभ्यासकाचा मार्ग अधिक खडकाळ करण्यासाठीच मराठी व्याकरणात घुसविलेले ' आहेत, त्यांचा सवनिसांनी निषेध केला आहे. ' राजवाड्यांनी तर आपल्या तथाकथित " ज्ञानेश्वरीच्या व्याकरणा "त ह्या लट, लोटचा कडेलोट केलेला दिसतो. ' आपल्या या मताच्या पुष्ट्यर्थ सवनिसांनी वामन मल्हार जोशांचा एक शेराही उद्धृत केला आहे : ' व्याकरणसाम्राज्यातील संज्ञारूपी नोकरशाहीच्या ताब्यात आपण इतके गेलो आहो की आता एक वेळ राजकीय स्वातंत्र्य मिळेल, पण व्याकरणात्मक मिळणे दुरापास्त ' [ सव ३५ ]

व्याकरणबाह्य विषय व्याकरणात येऊ नयेत, हे सवनिसांचे म्हणणे न्याय्य आहे. स्वतः दामल्यांनीही "वाक्प्रचार, अलंकार, वृत्ते ' इत्यादी विषय ' उपक्रमा 'त व्याकरणबाह्यच ठरविले आहेत. असे जे विषय दामल्यांच्या व्याकरणात आले असतील, त्याबद्दल त्यांना दोषी धरण्यास हरकत नाही. शब्दांच्या लिंगाविषयीचे नियम, ' वाक्यपृथक्करण ' इत्यादी विषय हे अंशतः अशा प्रकारचे म्हणता येतील. पण प्रत्ययानुरोधाने लिंगव्यवस्था सांगणे व्याकरणबाह्य नाही. अशी व्यवस्था सांगणारे 'लिंगानुशासन' पाणिनीय व्याकरणाला परिशिष्ट म्हणून जोडलेले असतेच. विशिष्ट प्रत्ययांच्या किंवा व्याकरणकार्यांच्या अनुरोधाने केलेल्या शब्दांच्या गटवार याद्या हाही व्याकरणबाह्य विषय नव्हे; पाणिनीय व्याकरणाला जोडलेला गणपाठ, धातुपाठ ही परिशिष्टे अशाच स्वरूपाची आहेत. ही परिशिष्टे म्हणजे पाणिनीची सूत्रे नव्हेत; पण यांच्या अभावी पाणिनीची बरीच सूत्रे अर्थशून्य होतील. एकाच नियमाच्या विवरणासाठी आलेली अनेक उदाहरणे ही अशा गणपाठाचा भाग म्हणता येणार नाहीत; हा टीकेचा भाग ठरेल. अशी उदाहरणे दामल्यांच्या व्याकरणात बरीच आहेत. पण त्यामुळे त्यांचे व्याकरण अशास्त्रीय न ठरता सटीक ठरेल, — म्हणजे दामल्यांच्या व्याकरणाचे सूत्रकार, वृत्तिकार ( म्हणजे, टीकाकार ) खुद्द दामलेच ठरतील. आता त्यांच्या व्याकरणातला सूत्रात्मक भाग कोणता, वृत्तीचा कोणता, हे ठरविण्याचा खटाटोप ज्यांना कुतूहल असेल, त्यांनी करावा. प्रयोगविचारापलीकडे वाक्यपृथक्करण हा विषय व्याकरणाच्या मर्यादाबाहेरचा आहे हे खरे आहे. हा विषय आपल्या ग्रंथात समाविष्ट करून दामल्यांनी ' शास्त्रीय व्याकरणा 'त शास्त्रालाच अडचण केली आहे. ध्वनिशास्त्र आणि छंदःशास्त्र यांच्या कक्षांतील कोणते विषय दामल्यांच्या व्याकरणात शेकडो पाने आले आहेत, हे सवनिसांनी स्पष्ट केलेले नाही. हे सर्व विषय कमी केले असता दामल्यांच्या व्याकरणाची शेदोनशे पानेच कशी राहतात, याचाही त्यांनी हिशेब दिलेला नाही.

भाषा आणि व्याकरण यांचा अन्योन्य संबंध, तसेच वैयाकरणाला प्रमाणभूत असलेला प्रयोग यांविषयी सवनिसांची कल्पना काही विलक्षणच आहे. ' बोली ' ( म्हणजे, बोलण्यातली भाषा असे समजू ) ही त्यांच्या मते खोटी भाषा आहे; आणि वाङ्मयात योजिली जाणारी भाषा ही खरी भाषा असून ती व्याकरणामुळे निर्माण आणि नियमित होते, असे ते समजतात. म्हणजे असे की, बोलीचे अवलोकन करून ( असे समजू; सवनीस तसे म्हणत नाहीत ) वैयाकरण त्यातले ग्राह्य काय ते ठरवितो ; हा ग्राह्यांश म्हणजे खरी भाषा. ती ग्रंथकार वैयाकरणांकडून शिकतात आणि तीत आपले ग्रंथ लिहून काढतात. अर्थात वैयाकरणाला अग्राह्य वाटणारी रचना करण्याचा अधिकार त्यांना नाही. व्याकरण-नियमांना धरूनच त्यांनी रचना करावी. आणि वैयाकरणांनीसुद्धा नियमांना अनुसरणारीच रचना ( हिलाच ' प्रयोग ' म्हणतात ) हिशेबात घ्यावी; अन्य घेऊ नये. प्रयोग म्हणजे ' भाषाप्रचार ' असा अर्थ

मानला (वस्तुतः तो तसा नाही), तरी ही भाषा दादोबादी शिष्टांना संमत असलेली अशीच घ्यावयास हवी; तरच वैयाकरणाची 'प्रयोगशरणता' समर्थिता येईल. वाटेल त्या गण्यागंप्याच्या (या शब्दाचा प्रयोग दादोबादी शिष्टांनी केलेला नाही, क्षमस्व!) भाषाप्रयोगापुढे वैयाकरणाने लोटांगण घालावे, असे कसे म्हणता येईल? दामल्यांसारखे लोक असल्या गण्यागंप्यांचे व्याकरण-नियमांविरुद्ध असलेले भाषाप्रचार शिरोधार्य मानून दादोबांसारख्या शिष्टांना वेळोवेळी चापतात, याचा सवनिसांना राग येतो.

सवनिसांचे हे सर्व प्रतिपादन त्यातल्या शुद्ध तर्कदुष्टतेसाठी कौतुक करण्यासारखे आहे. मुळात बोलण्यातली भाषा खोटी समजणे म्हणजे व्याकरणाचा आधारच काढून घेणे होय. बोलण्यातला प्रचार गुंडाळून ठेवून वैयाकरण नियम बांधणार, तो कशाला प्रमाण मानून? आपल्या लहरीला? व्याकरणनियम व्याकरण-काराच्या (?) लहरीने ठरतात, असे सवनीस समजत असतील, तर त्यांना इतर वैयाकरणांच्या मतांचे खंडन करण्याचे काही कारण नाही. (ते त्यांनी केले आहे.) आणि वैयाकरणाच्या लहरीखेरीज नियामक तत्त्व व्याकरणाला काही असेल, तर ते बोलण्यातल्या भाषेहून अन्य कोणते असू शकेल? व्याकरणाचे नियम वैयाकरण आपल्या कल्पनेतून तर काढत नाही ना? मग ज्या भाषेतले काही प्रयोग (म्हणजे usage) प्रमाण मानून तो नियम बांधतो, त्याच भाषेतले अन्य प्रयोग याच नियमांच्या आधाराने अप्रमाण ठरविण्याचा त्याला काय अधिकार आहे? प्रयोग, म्हणजे सवनिसांच्या अर्थाने व्याकरणनियमानुरोधी रचना, वैयाकरणाने ठरवावयाची, आणि तिला शरण जाऊन त्याने इतर रचना अग्राह्य ठरवावयाच्या, म्हणजे कायदा करण्याचा, त्याचा अर्थ लावण्याचा आणि फाशी देण्याचा अधिकार एकाच व्यक्तीकडे देण्यासारखे आहे. सवनिसांना भीती प्रमाणभाषेच्या व्याकरणात उपभाषेतील किंवा प्रामादिक प्रयोग संमत होण्याची वाटत असावी; म्हणून त्यांनी शेवटी 'दादोबा सांगतील ते ऐकू' असा पवित्रा घेतला आहे. पण दादोबा सांगणार ते तरी कशावरून, हाच मुळात प्रश्न आहे. आणि दादोबांनी सांगितले आहे (उदाहरणार्थ स्त्रीलिंगी 'जात्ये' इत्यादी रूपे), त्याहून वेगळे जे सवनिसांच्या स्वतःच्याच व्याकरणात आहे, त्याचे समर्थन ते कसे करणार आहेत? भाषा-व्याकरण संबंधाविषयी असल्या भोंगळ-भावड्या कल्पना 'उच्चतर' क्षेत्रातही अद्याप प्रचलित असाव्या, ही आश्चर्याची गोष्ट आहे. आपणांपैकी काहींना वाटेल, मी काहीतरी पाखंड सांगतो आहे. म्हणून शंभर वर्षांपूर्वी एका मराठी वैयाकरणाने काय लिहून ठेविले आहे, ते आपणाला वाचून दाखवितो :

'अमुक एक रूढीतला नियम तुमच्या व्याकरणामध्ये लिहिलेला नाही, म्हणून त्याप्रमाणे तुम्ही बोलू नका, व लिहू नका, असे ज्यांची ती भाषा असेल, त्यांना सांगणे हा मोठा जुलूम आहे; याकरिता व्याकरणामध्ये हा नियम नसला तर आता घालावा, आणि व्याकरण शुद्ध करावे. ...... भाषेचे स्वरूप दाखविण्याला व्याकरण हा एक आरसा आहे. आणि त्या आरशामध्ये जर त्या भाषेचे वास्तविक स्वरूप दिसत नाही, तर तो आरसा निरुपयोगी होय.'

[रामचंद्र भिकाजी गुंजीकर :
'विविधज्ञानविस्तार', जुलै १८७० ]

दामल्यांच्या परिभाषेविरुद्ध सवनिसांनी वामन मल्हार जोशांच्या पाठिंब्याने फिर्याद गुदरली आहे, तीही अशीच बालिश आहे. दामले ज्या कारणासाठी प्रचलित संज्ञा सोडून 'ताख्यात, लाख्यात' इत्यादी नव्या संज्ञा रुजू करितात, त्या कारणांचे खंडन न करिता त्यांच्या संज्ञांना नुसते नाक मुरडणे, तिला 'संज्ञारूपी नोकरशाही' वगैरे म्हणणे याला शास्त्रीय चर्चेत तरी काही किंमत नाही- (विधानसभेत, लोकसभेत असली तर असेल!) राजवाड्यांच्या लट्-लिट्-लोट्‌विरुद्ध तक्रार करण्यात काही अर्थ आहे; कारण पाणिनीय व्याकरणातल्या काही संज्ञा त्यांनी त्यांचा अर्थ विशद न करिताच योजिल्या आहेत, आणि त्यातल्या 'सुबंत, तिङंत' अशा काही तर मराठीत गैरलागूच आहेत. पण जुन्या संज्ञा न स्वीकारण्याचे कारण सांगून नव्या संज्ञा कायदेशीरपणे – म्हणजे लक्षणपुरस्सर – योजण्यात दामल्यांनी काय अपराध केला आहे? दादोबादिकांच्या संज्ञा सोडून नव्या संज्ञा योजणे हाच अपराध असेल, तर अशा 'प्राकृतेय, वाक्येय, मुखपदांतर' इत्यादी नव्या संज्ञा स्वतः सवनिसांनी योजल्या आहेत, त्यांची काय वाट? नव्या संज्ञा दुर्बोधतेमुळे अस्वीकार्य, असा सवनिसांचा अभिप्राय असेल, तर प्रथम हे सांगितले पाहिजे की,

सुबोधता-दुर्बोधता हा मुद्दा शास्त्रग्रंथात गैरलागू आहे; आणि गैरलागू नसला, तरी, खुद्द सबनिसांचा ग्रंथ भरपूर दुर्बोध आहे.

व्याकरणकार दामल्यांविषयी आपण आतापर्यंत उलटसुलट पुष्कळ ऐकले. दामल्यांच्या पदरात काही गुण बांधले गेले, काही दोष बांधले गेले. या दोहोंचे अवधान राखून आता निर्णय करावयाचा आहे. मराठी व्याकरणाच्या परंपरेत दामल्यांचे नक्की श्रेय काय, ते ठरवायचे आहे. 'दामल्यांच्या ग्रंथाची उपयुक्तता काय,' या मी व्याख्यानाच्या आरंभीच उत्तर दिलेल्या प्रश्नापेक्षा हा आताचा प्रश्न वेगळा आहे; त्याचे उत्तरही पहिल्याच्या उत्तराहून अवघड आहे.

एखाद्या शास्त्रावर पूर्वपरंपरा नसताना प्रथमच ग्रंथ लिहिणे हे काम अवघड असते. तो ग्रंथ सदोष असेल, दुसऱ्या ग्रंथाचे अनुकरण असेल, अपूर्ण असेल; पण अशा ग्रंथाचे म्हणून श्रेय निःसंशय असते. चुकीचे असले, तरी अशा सुरवातीच्या ग्रंथातून होणारे सामग्रीसंकलन पुढच्या ग्रंथांना उपकारक होते. दामल्यांना हे श्रेय अर्थातच देता येणार नाही. हे श्रेय केरी आणि वैजनाथ पंडित, क्रमवंत-फडके-घगवे, दादोबा अशा काही थोड्याच वैयाकरणांना देता येईल. दामल्यांच्या पाठीशी शंभर वर्षांची परंपरा आहे. सामग्री–संकलन हा प्रश्नच त्यांच्यापुढे नव्हता. दादोबांचे मोठे व्याकरण आणि त्याची पूरणिका, कृष्णशास्त्री आणि रावजीशास्त्री गोडबोल्यांची व्याकरणे, आगरकरांची वाक्यमीमांसा,– प्रायः या ग्रंथातली सामग्री पुनरुक्ती वजा करून एकत्र केली, की दामल्यांच्या व्याकरणातली सामग्री झाली. या सर्व सामग्रीने दामल्यांच्या व्याकरणातली सुमारे सात-आठशे पृष्ठे व्यापली असतील; कारण दादोबांचे व्याकरण आणि त्याची पूरणिका यांचीच पृष्ठसंख्या मुळी सहाशेच्या घरात जाते. तेव्हा दामल्यांच्या व्याकरणाचा जवळजवळ तीनचतुर्थांश भाग हा पूर्व वैयाकरणांकडून त्यांना मिळालेला आहे. राहिलेला सुमारे एकचतुर्थांश भाग दामल्यांचा स्वतःचा म्हणता येईल. तो प्रायः चर्चाचिकित्सात्मक आहे. शास्त्रीय ग्रंथाचे मूल्य आंबे-केळी-चिक्कू-पेरू-प्रमाणे नगांवर, म्हणजे पृष्ठसंख्येच्या हिशेबाने मोजता येत नाही, किंवा कांद्यांबटाट्यां-प्रमाणे वजनावर ठरविता येत नाही, हे मला माहीत आहे. दामल्यांच्या व्याकरणाचा पृष्ठसंख्येत हिशेब देण्यामध्ये माझा तसा हेतू नाही. दामल्यांचे श्रेय निश्चित करण्यासाठी नेमके कशावर लक्ष केंद्रित केले पाहिजे, ते सांगण्यासाठी हा हिशेब केला आहे. आता प्रश्न असा की, दामल्यांच्या व्याकरणात खुद्द दामल्यांची अशी जी ही दोनतीनशे पृष्ठे राहतात, त्यांत पूर्ववैयाकरणांनी केले नसून दामल्यांनी केले असे नेमके काय आहे? दामल्यांचे व्याकरण स्वतःला शास्त्रीय म्हणवते. तेव्हा मराठी व्याकरणाला दामल्यांनी शास्त्रीय दृष्टिकोन दिला, असे म्हणता येईल काय? असे म्हणता आले असते, जर मला बरे वाटले असते. पण तशी वस्तुस्थिती नाही. हे श्रेय चिपळूणकर आणि गुंजीकर यांच्याकडे जाते. दामल्यांच्या व्याकरणात शास्त्रीय भूमिके-संबधाने जे काही आले आहे, तो प्रायः या दोघांपैकी कोणाचा तरी अनुवाद आहे. ही भूमिका दामल्यांच्या रक्तात भिनलेली दिसत नाही. म्हणूनच तर एकीकडे ही भूमिका सांगत दुसरीकडे ते तिच्याविरुद्ध प्रतिपादन किंवा आचरण करतात.

तेव्हा दामल्यांनी नव्याने केली, अशी एकच गोष्ट त्यांच्या व्याकरणात उरते. ती म्हणजे त्यांनी मराठी व्याकरणातल्या विविध लहानमोठ्या विषयांवर घातलेले वाद. शास्त्रीय विषयात पद्धतशीर केलेल्या वादाला फार महत्त्व आहे. यामुळे विवाद्य प्रश्नाच्या उलटसुलट बाजू तपशीलवार पुढे येतात. अशा वादाच्या प्रदीर्घ परंपरे-मुळेच संस्कृत शास्त्रग्रंथांना मराठी शास्त्रग्रंथांत दुर्मीळ असलेला एक रेखीवपणा आला आहे. न्यायालयाच्या कामात वकिलांना जे महत्त्व आहे, तेच शास्त्रीय विषयात वादकर्त्यांना आहे. आता दामल्यांनी जे वाद केले आहेत, त्यांतलेही सर्व मुद्दे, सर्व प्रमाणे, सर्व उपपत्ती सर्व निष्कर्ष दामल्यांनी नव्याने मांडले आहेत, असेही नाही. यातलाही पुष्कळसा भाग त्यांना पूर्ववैयाकरणां-कडून मिळाला आहे. त्याचा उगम त्यांनी काही ठिकाणी सांगितला, तर काही ठिकाणी सांगितला नाही, हे वेगळे. तो सर्व शोधून काढला, तर दामल्यांची पाने आणखी कमी होतील. भर्तृहरी सज्जनांचे वर्णन करताना 'परगुण-परमाणून् पर्वतीकृत्य नित्यं...' असे एक त्यांचे वैशिष्ट्य सांगतो. येथे त्याच्या उलट प्रकार चालला आहे. यामुळे कदाचित मी दुर्जन ठरेन. पण शास्त्र आणि इतिहास या क्षेत्रात प्रमेयांचे मूल्य सज्जनतेच्या निकषावर ठरविण्याची पद्धत व्यवहारतः असली तरी निदान तत्त्वतः नाही. त्यामुळेच 'व्यक्ति

विवेक'कार महिमभट्टाला असेम्हणण्याचे धैर्य झाले की, आता मी काव्यदोष खविसासारखे टिपून सांगतो — 'तान् अखिलान् खलाः इव व्याख्यास्यामः ।' त्या महिमभट्टाला गुरुस्थानी कल्पून मी दामल्यांच्या कार्याचा हिशेब मांडला आहे. त्या हिशेबाने मराठी व्याकरणाच्या परंपरेत मोरो केशव दामले हे मुख्यतः संग्राहक आणि वादकर्ते ठरतात. हेही श्रेय काही लहान नाही. व्यवहारतः पाहिले, तर व्याकरणासारख्या विषयात शंभर वर्षांच्या परंपरेनंतर हजार पानांचा मजकूर पूर्वीच्यांचे काहीही न घेता सर्वस्वी नवीन लिहिणे हे अशक्यप्राय आहे. दामल्यांनी स्वतःसुद्धा असे अवास्तव उद्दिष्ट आपल्यासमोर ठेविले नव्हते. त्यांची उद्दिष्टे त्यांनी स्वतःच प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे दोन आहेत :

(१) खेर आणि आगरकर या दोघांनी बेनच्या इंग्रजीच्या व्याकरणाला आदर्शस्थानी ठेवून मराठीच्या व्याकरणाची दोन अंगे ( पदमीमांसा, वाक्यमीमांसा ) विवेचिली. त्यांचा सांधा नीट जुळविणे.

(२) 'होता होईल तो व्याकरणाच्या लहान मोठ्या सर्व मुद्यांची यथाशक्ती छाननी' करणे.

यांपैकी दामल्यांचे पहिले उद्दिष्ट फसले आहे; कारण ते म्हणतात ती वाक्यमीमांसा – निदान तिच्यातला 'वाक्यपृथक्करण' हा मोठा भाग – व्याकरणाचा विषयच होऊ शकत नाही. दुसरे उद्दिष्ट साधले आहे. त्याचे श्रेय दामल्यांपासून कोणीच हिरावून घेऊ शकत नाही.

[ संक्षेपांचे विवरण :

संक्षेपांमागून येणारे आकडे पृष्ठांकांचे. जसे : 'दाम/१:२८४' यात २८४. शून्योत्तर आकडे त्या त्या पुस्तकाच्या प्रस्तावनेतले.

पृ पूर्वोक्त ग्रंथ. 'किन्ना', Ibidom.

दाम/१ : मोरो केशव दामले –
'शास्त्रीय मराठी व्याकरण'
पहिली आवृत्ती (१९११)
(दुसरी आवृत्ती पृ. ३६९–पासून दोन पृष्ठे पुढे आहे. अर्थात तीत मजकूर पाहताना या भागात दोन पृष्ठे वजा करावी. पृ. ३३९–३६९ या भागात हळूहळू फरक पडत अखेर दोन पृष्ठांची आघाडी मारली गेली आहे. पृ. ३३९–पर्यंत पहिल्या-दुसऱ्या आवृत्तींतली पृष्ठे समान आहेत.)

राज/ति विश्वनाथ काशीनाथ राजवाडे –
'तिङंतविचार'
(राजवाडे-लेखसंग्रह, भाग २)

राज/सु विश्वनाथ काशीनाथ राजवाडे –
'सुबंतविचार'

सब महादेव पांडुरंग सबनीस
'आधुनिक मराठीचे उच्चतर व्याकरण' ]

• • •

## साभार स्वीकार

**छांदसी** ( समीक्षालेखन ): पु. शि. रेगे, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; १५ रु.

**तुलनात्मक छंदोरचना :** ना. ग. जोशी, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; १५ रु.

**नाटककाराच्या शोधात सहा पात्रे** : अनु. माधव वाटवे, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ४ रु.

**काश्मीर प्रश्न :** ले. व प्रकाशक श्री. वि. गाडगीळ, टिळक रस्ता, पुणे २; ३ रु.

**घालमेल** ( ललितलेख ): ल. शं. सवनीस, सेवा प्रकाशन, अमरावती २; ५ रु.

**मातृमंदिर** ( दीर्घकथा ) : द. मो. दामले, सौ. नीरजा व उज्ज्वला दामले, सोलापूर; ४ रु.

**कधी बहर कधी शिशिर** ( कथा ) प्रभाकर अत्रे, श्री शारदा प्रकाशन, पुणे २; ४ रु.

**न रंग ना रूप** ( भावसुमने ): पां. गो. लोहोकरे, सदभिरुचि प्रकाशन, पुणे २; ५ रु.

**हासत कर्म करावे** ( कादं. ) : पां. गो. लोहोकरे, भारतीय प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ५ रु.

श्री

ज्ञानदेवी बारावा अध्याय

# पाठनिश्चितीची प्रक्रिया

● श्री. ना. वनहट्टी ●

( मागील अंकावरून पुढे चालू )

१

बाराव्या अध्यायातील पाठांची चर्चा गेल्या अंकावरून पुढे चालू करण्यापूर्वी त्या अंकात आलेल्या श्री. वि. मो. केळकर यांच्या " ज्ञानदेवीच्या दोन प्रती " या लेखाचा विचार करणे अवश्य वाटते. या लेखात त्यांनी ज्ञानदेवीची राजवाडे प्रत आणि प्रा. न. र. फाटकांजवळ असलेली हस्तलिखित प्रत, जिला पाठसंशोधित आवृत्तीत आम्ही **न** हे सांकेतिक चिन्ह दिले आहे, या दोन प्रतींचे प्राचीनत्व सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे.

" राजवाडे-प्रत नाथपूर्वकालीनच नव्हे, ज्ञानेश्वरांना जवळात-जवळच नव्हे, यादवकालीनच नव्हे तर ज्ञानेश्वरकालीनच असली पाहिजे " असे त्यांनी म्हटले आहे. "राजवाडे प्रत ही एकनाथांनी ज्ञानेश्वरी संशोधनासाठी जमविलेल्या प्राचीन प्रतींपैकी एका प्रतीची नक्कल आहे" आणि "फाटक प्रत ही नाथकालीन म्हणजे नाथांची किंवा त्यांनी संशोधिलेल्या प्रतीवरून नकललेली असे म्हटले तर ते चुकीचे ठरेल काय ? " ( या प्रश्नाचे ' अर्थात नाही ' हे उत्तर गृहीत आहे. ) अशी आणखी विधाने त्यांनी केली आहेत.

यात दोन प्रतींविषयी दोन मुद्दे आहेत. राजवाडे प्रत ही ज्ञानदेवकालीन आहे, हा एक व फाटक प्रत ही नाथांनी संशोधिलेली किंवा त्यांनी संशोधिलेल्या प्रतीवरून नकललेली प्रत होय, हा दुसरा. यांचा क्रमाने विचार करू.

राजवाड्यांना मिळालेली पोथीच खुद्द ज्ञानदेवांच्या काळातली असली पाहिजे असे म्हणणारे लोक याचा विचार करीत नाहीत की साध्या वासनात बांधलेली कागदाची वस्तू सहाशेवीस वर्षे टिकून राहणे शक्य आहे काय ? इतक्या जुन्या काळची कागदावरील हस्तलिखिते जगात आज हाताच्या बोटांवर मोजण्याइतकी असतील नसतील. ही मंडळी चमत्कारवादी दिसतात. ज्ञानदेवांनी रेड्याच्या तोंडून वेद बोलविले त्याप्रमाणे सहाशे वर्षांनंतर अवतरणाऱ्या लाडक्या संशोधकाकरिता पाटांगण देवस्थानात आपल्या वेळची एक पोथी कृपापाखर घालून त्यांनी जतन करून ठेवली, असा यांच्या म्हणण्याचा अर्थ दिसतो.

ही अशक्यता बाधू नये म्हणून राजवाडे प्रत ' एकनाथांनी जमविलेल्या प्राचीन प्रतींपैकी एका प्रतीची नक्कल आहे ' असे विधान करण्यात येते. असे म्हणण्याने आपला सगळा दावा कोसळतो हे वास्तविक यांच्या लक्षात यावयास पाहिजे होते. 'प्राचीन' म्हणजे केव्हाची ? 'नक्कल' केव्हा केलेली ? नक्कल म्हटले की त्यात बदल झाला असण्याचा संभव उत्पन्न होतो. मुळात राजवाडे प्रतीचा असा एकनाथांशी संबंध जोडण्याला जो आधार दाखविला जातो त्याविषयी पुढे पाहू.

राजवाडे प्रतीची आणि महानुभावांच्या साती ग्रंथांची भाषा यांमध्ये साम्य आहे, हे पूर्वी अनेकांनी उल्लेखिलेले प्रमाण केळकरांनी इथे पुढे मांडले आहे. साम्य आहे हे सर्वांनी मान्य केले आहे. ते कोणत्या प्रकारचे आहे व त्यावरून काय सिद्ध होते याचा नीट विचार व्हायला पाहिजे. मुतावरून स्वर्गाला जाण्यासारखा प्रकार होऊ नये. भाषेचे साम्य म्हणजे काय ? भाषेत शब्द असतात आणि रूपप्रक्रिया असते. पोथ्यांच्या नकला होत असताना यांपैकी कोणतेही एक अंग किंवा दोन्ही बदलली जाऊ शकतात. राजवाडे प्रतीत शब्द बदलले गेले आहेत पण रूपे बऱ्याच कमी प्रमाणात बदलली गेली असावीत. त्यामुळे तिच्यात भाषेच्या प्राचीन-

तेची ढब टिकून आहे. मुळीच वदलली गेली नाहीत असे मात्र नाही. भूतकाळी प्रथमपुरुषी ' जालां ' ( १२-९१ ) या रूपाच्या निकट ' आलों ' ( १२-८९ ) हे रूप या प्रतीत दिसते. पहिले प्राचीन व दुसरे अलीकडचे आहे. सध्या तेच चालू आहे. पुढील पाठचर्चेत आणखी काही असली रूपे दिसून येतील. प्राचीन रूपे शंभर असली व अलीकडचे एखादे असले तरी त्यावरून प्रत अलीकडची असल्याचे सूचित होते. कारण प्राचीन रूपे नंतर नकलली जाऊ शकतात पण नंतरचे रूप पूर्वीच्या काळात जाऊ शकत नाही. *जेया स्थिती* (१२-२२७) अशी स्त्रीलिंगी नामांच्या विशेषणांची पुल्लिंगी रूपे खुद्द ज्ञानदेवकालीन पोथ्यांत येणे शक्य नाही हे विचारांती लक्षात येईल. सध्याच्या लेखकाने चांगला स्थिती असे लिहिण्याप्रमाणे हे आहे. असे विजोड लेखनप्रकार कित्येक शतकांनी प्राचीन रूपांची यथार्थ जाणीव बुजू लागल्यानंतर पोथ्यांमध्ये घुसणे शक्य आहे.

प्राचीन महानुभावीय काव्यांशी राजवाडे प्रतीचे जे भाषासाम्य आढळते त्याच्या इतर मर्यादांचाही विचार करावयास पाहिजे. महानुभावीय काव्याची जुन्यात जुनी पोथी शके १४५७ मध्ये लिहिलेली आढळते; आणि तेव्हापासून शके १५०० पर्यंत लिहिल्या गेलेल्या काही पोथ्या उपलब्ध होतात असे विख्यात महानुभावतज्ज्ञ डॉ. वि. भि. कोलते यांनी म्हटले आहे. काही कालनिर्देशरहित पोथ्या अतिजीर्ण असल्याचा उल्लेख केला जातो. पण कागद जीर्ण होणे, त्याचा तुकडा पडणे, या गोष्टींवर विशुद्ध अनुमान काही निघू शकत नाही. कागद कोणत्या वस्तूपासून कसा बनविला यावर आणि पोथीची जपणूक वापरणूक यांवर पोथ्यांची अवस्थिती फार मोठ्या प्रमाणावर अवलंबून असते. याचे तात्पर्य असे की, महानुभावीय पोथ्या शके १४५० पासून म्हणजे एकनाथकालापासून पुढच्या मिळू शकतात, तेव्हा त्यांच्या भाषेमध्येही एकनाथकालीन शब्दरूपांचे मिश्रण झाले असणे शक्य आहे. त्या भाषेशी साम्य दर्शविणारी पोथी " ज्ञानेश्वरकालीनच असली पाहिजे " असा ठाम सिद्धान्त निघू शकत नाही.

हे शब्दरूपांविषयी झाले. केवल शब्दांविषयीचा विचारही महत्त्वाचा आहे. तो पूर्वग्रहरहित निर्लेप मनाने केला तर राजवाडे प्रत अनेक स्थली वदललेले पाठ देते असे सवळ अनुमान निघते. म. सा. पत्रिकेच्या याच ( १६६ ) अंकातील प्रस्तुत लेखकाचा ' ज्ञानदेवी पाठनिश्चितीची प्रक्रिया ' हा लेख पाहिल्यास त्यात १२·३ मध्ये परियें देसि या मूळ पाठाऐवजी राजवाडे प्रतीने हालवीसि पैं असा पाठ घातला असल्याचे महानुभावीय काव्यांच्याच आधाराने सिद्ध केलेले दिसेल. हे उदाहरण राजवाडे प्रतीचे उत्तरकालीनत्व दर्शविते.

आणखी महत्त्वाची गोष्ट सुचवावयाची ती ही की वैचारिक गोंधळावद्दल आपण जपावयास पाहिजे. आपणाला पाहिजे काय ? खुद्द ज्ञानदेवांची रचना की ज्ञानदेवकालीन भाषा ? ज्ञानदेवांची रचना हे आपले साध्य आहे. तिच्या शक्य तितके जवळ जाण्याचा प्रयत्न करणे हे आपले काम आहे. ज्ञानदेवकालीन भाषा मिळून ज्ञानदेवांनी काय लिहिले त्यापासून आपण पूर्वीइतके दूर राहू, असेही शक्य आहे. कारण ज्ञानदेवीतील पाठभेद केवळ भाषेच्या कालगत परिवर्तनामुळे उत्पन्न झालेले नाहीत. वरचेच उदाहरण घेतले तर

*हृदयाकाशपल्लकीं । परियें देसि निजे* ( एकनाथ )
*हृदयकोशपालकीं । हालवीसि पैं ।* ( राजवाडे )

हे दोन्ही पाठ भाषेच्या दृष्टीने ज्ञानदेवकालीन असू शकतात. आणि खुद्द ज्ञानदेवांनी कोणता योजिला असावा हा प्रश्न जेथल्या तेथे राहतो. त्याचा निर्णय इतर आधारांवरून करावा लागतो.

फाटक प्रतीविषयी आता विचार करू. प्रस्तुत प्रतीचे आतापर्यंत जे अवलोकन घडले आहे, त्यावरून या प्रतीतील पाठ राजवाडे प्रतीपेक्षा अधिक जुने, म्हणजे ज्ञानदेवांच्या रचनेच्या अधिक जवळ जाणारे असावे असे प्रस्तुत लेखकाचे मत बनले आहे. अशा पाठांची काही उदाहरणे ' पाठनिश्चितीची प्रक्रिया ' या लेखाच्या पुढील भागांमध्ये येतील. हे मत प्रस्तुत लेखकाचेच बनले किंवा त्यानेच ते प्रथम प्रगट केले असे मात्र नाही. ते श्रेय शंकर बळवंत सहस्रबुद्धे यांचे आहे. केळकरांनी जिला फाटक प्रत म्हटले आहे ती मूळ पोथीवरून नकलण्याचे काम यांनीच केले असे सांगितले जाते. ही प्रत आणि राजवाडे प्रत यांचा तुलनात्मक अभ्यास करून यांनी एक लेख लिहिला तो विविधज्ञानविस्ताराच्या जानेवारी १९११ च्या अंकात प्रसिद्ध झाला. त्यात ते म्हणतात,

"रा. माडगांवकर यांना पाटांगणाच्या नवीन मठात एक हस्तलिखित प्रत १९०६ साली मिळाली; ती प्रत व राजवाडे यांची छापील प्रत ह्यांच्या तुलनात्मक अभ्यासावरून माडगांवकर यांच्याजवळ सध्या असलेली

प्रत जास्त 'अस्सल' व ज्ञानदेवकालीन होय अशी माझी खात्री झाली." यातील खात्री हा शब्द लक्षात घेण्याजोगा आहे.

या, म्हणजे फाटक प्रतीच्या १, १०-१६ व १८ या अध्यायांच्या आरंभीच्या नमनात 'श्रीमज्जनार्दन-गुरुभ्यो नमः' असे म्हटले आहे. यावरून एकनाथांचे गुरु जे जनार्दनस्वामी तेच या प्रतीच्या लेखकाचे गुरू असले पाहिजेत; म्हणून 'फाटकप्रत ही नाथांची किंवा त्यांनी संशोधिलेल्या प्रतीवरून नकललेली' प्रत असावी, अशी अनुमाने केळकरांनी बांधली आहेत.

फाटक प्रतीत उल्लेखिलेले जे जनार्दन तेच एकनाथांचे गुरू जनार्दन कशावरून? निवळ नामैक्यावरून काही अनुमान बांधणे धोक्याचे असते. जनार्दनाच्या बाबतीत असे सिद्धवत अनुमान करणे पोकळ ठरण्याचा संभव आहे. याचे कारण रामा जनार्दन, जनी जनार्दन असे अनेक जनार्दन नाव लावणारे सत्पुरुष त्या काळात होऊन गेले. या नावांतले 'जनार्दन' हे एकनाथगुरु जनार्दन नव्हेत. राजवाड्यांनी त्यांना मिळालेल्या पोथीच्या अखेरीस 'सद्गुरुमुकुंद' हा शब्द आढळल्या-बरोबर विवेकसिन्धू मुकुंदराजांशी त्याचे एकत्व कल्पिले. नामैक्यावरून उभविलेले असे कित्येक डोलारे आजवर कोसळले आहेत. तरी देखील त्याच प्रवृत्तीचा वारसा चालविण्याचा मोह अद्याप संशोधकांना होत असतो.

फाटक प्रतीतील जनार्दन म्हणजे एकनाथगुरु जनार्दनस्वामी असे जरी धरून चालले तरी फाटक प्रत ही नाथांनी संशोधिलेली किंवा त्यांनी संशोधिलेल्या प्रतीवरून नकललेली प्रत असे सिद्ध होत नाही. या प्रतीचा लेखक पूर्ववयात एकनाथांचा गुरुबंधू असला तरी नंतर आपल्या गावी गेल्यावर त्याने ज्ञानदेवीची प्रत केली असेल. तिची माहिती एकनाथांना असेल किंवा नसेल. फाटक प्रतीचा लेखक ज्या काळात जनार्दन स्वामीजवळ होता, त्या काळाच्या आगे किंवा मागे एकनाथ जनार्दन स्वामीपाशी असतील. अनेक शक्यता आहेत.

राजवाडे प्रत किंवा फाटक प्रत हीच नाथसंशोधित प्रत किंवा तिजवरून नकललेली प्रत असे दाखविण्याचा अलीकडे वराच प्रयत्न होत असतो. ज्याला एक प्रकारे अंतर्गत म्हणता येईल असा पुरावा या कल्पनेच्या विरुद्ध जातो. माडगांवकरांनी आपली संशोधित आवृत्ती तयार करण्याकरिता पैठण येथील एकनाथांच्या मठातली शके १५५१ साली लिहिलेली पोथी आणविली होती. त्यांची संहिता बव्हंशी या प्रतीवरून तयार झाली आहे. अहमदनगर पैठणच्या जवळ. तेथे शके १५१५ मध्ये लिहिली गेलेली पोथी तंजावरच्या सरस्वती महाल ग्रंथालयात विद्यमान आहे. शेवगाव ऊर्फ सेगाव तर पैठणच्या अगदी जवळ; दहा मैलांच्या आतच असेल. तेथील निजानंदस्वामींनी शके १५४९ साली लिहिलेल्या प्रतीची शके १६३२ साली केलेली प्रत उपलब्ध झाली आहे. या तिन्ही प्रतींतील पाठ बहुंशी सारखे आहेत. तिन्ही प्रतींच्या शेवटी एकनाथ-शुद्धीच्या ओव्या आहेत. या ओव्या एकनाथांनी लिहिल्या नाहीत, असे आजपर्यंत कोणी म्हटले नाही व पहिल्या तीन ओव्यांच्या बाबतीत तरी तशी संभवनीयता नाही. तेव्हा स्थलकालाने समीप असलेल्या आणि एकनाथांची प्रतिशुद्धीची मुद्रा असलेल्या या प्रतींमध्ये एकनाथांनी प्रतिशुद्ध केलेला ज्ञानदेवीचा पाठ बहुतांशाने प्रतिबिंबित झालेला असला पाहिजे हे उघड आहे. कोणाही पूर्वग्रह-रहित बुद्धीच्या मनुष्यास पटतील इतकी ही प्रमाणे बळकट आहेत.

आणि, वरील तीन प्रतींशी फार मोठ्या प्रमाणात न जुळणारे पाठ देणारी राजवाडे किंवा फाटक प्रत ही नाथसंशोधित, किंवा तिजवरून नकललेली, किंवा नाथ-पुरस्कृत प्रत नव्हे ही गोष्ट तितकीच स्पष्ट आहे. या दोन्ही प्रतीत नाथशुद्धीच्या ओव्या नाहीत, ही एकच गोष्ट नाथकृत प्रतिशुद्धीशी यांचा काही संबंध नाही हे दर्शविण्यास पुरेशी आहे. याउपर तिच्यातील पाठ पाहिले म्हणजे तर वरील असंबंध 'द्विर्वद्धम् सुवद्धम्' या न्यायाने दृढ होतो.

विजापूरचे श्री. ना. व. जोशी यांनी एकनाथांचे पणतू (मुलीच्या मुलीचे पुत्र) शिवरामस्वामी यांनी आपल्या गीतार्थचंद्रिका नामक गीताटीकेसाठी आधारभूत म्हणून ज्ञानदेवीची जी प्रत घेतली तीच राजवाडे प्रत होय आणि ती एकनाथांनी प्रतिशुद्ध केलेल्या प्रतीवरून उतरून घेतली असली पाहिजे, असे मत सन १९५८ मध्ये एका लेखात मांडले. तेथूनच या मताच्या प्रचलनास सुरवात झालेली दिसते. श्री. जोशी यांच्या प्रतिपादनाचे सविस्तर परीक्षण करण्यास येथे अवकाश नाही. तथापि राजवाडेप्रत जर एकनाथ-संशोधित प्रतीवरून उतरलेली, तर तिच्यात एकनाथशुद्धीच्या ओव्या का नसाव्यात

याचे स्पष्टीकरण जोश्यांना देता आले नाही. या ओव्या ज्यांच्यात आहेत अशा, एकनाथशुद्धीकरणाच्या स्थलकालाला निकटच्या पोथ्यांमध्ये राजवाडे प्रतीच्या पाठांहून वेगळे असे शेकडो, हजारो पाठ का आढळावे, याचा विचार त्यांनी केलेला दिसत नाही.

तेव्हा सर्व बाजूंनी विचार करता म. सा. पत्रिकेच्या गेल्या (१६६ व्या) अंकात पृ. १० वर प्रस्तुत लेखकाने राजवाडेप्रत आणि फाटकप्रत यांच्याविषयी जो अभिप्राय व्यक्त केला आहे तो उपलब्ध आधारांशी अधिकात अधिक जुळणारा असल्यामुळे योग्य ठरतो. फाटक (**न**) प्रतीतले पाठ अधिक जुने व विश्वसनीय कसे, हे या लेखमालेत यथावकाश प्रकट होईल.

राजवाडेप्रत प्रसिद्ध झाल्यापासून अनेकांनी तिजवर टीका केली ती आधारप्रमाणांनिशी केली. "कोणी काहीही म्हटले आणि कितीही नाक मुरडले तरी राजवाडेप्रत ...... ज्ञानेश्वरकालीनच असली पाहिजे ......" असे केळकर म्हणतात. भागवतोत्तम असूनही बुद्धिप्रधान चिकित्सेत कमी नसलेले मामासाहेब दांडेकर आपल्या बाजूने आहेत ही 'नाक मुरडणाऱ्यां'ना समाधानाची बाब वाटेल. राजवाडे प्रतीचे महत्त्व कोणीही अमान्य केलेले नाही. टीकाकारांनी ते पहिल्या सलामीस मान्य केले आहे. अर्थात केळकरांनी (प्रा. मंगरूळकरांसह) त्या प्रतीचा जो अन्वयार्थ लिहून पुरा केला आहे तोही महत्त्वाचा आहे. त्याचे महत्त्व कोणी कमी लेखील अशी आशंका बाळगण्याचे कारण नाही.

२

गेल्या अंकात चर्चेसाठी जे पाठभेद दाखल केले त्यांत तुझिये-तुझेनि हा एकच रूपबदलाचा होता; बाकीचे सर्व शब्दबदलाचे होते. शब्दरूपे निश्चित करण्याचा प्रश्न 'त्या मानाने थोडा सोपा' व 'अभ्याससाध्य' झालेला आहे (पृ. ६ स्तंभ २) असे तिथे म्हटले. पण हा प्रश्न कमी गुंतागुंतीचा व अल्प अभ्यासाने साध्य आहे असे समजण्याचे कारण नाही. महत्त्वाच्या विश्वसनीय प्रतींमध्ये देखील रूपांची विविधता खूप आढळते. दोनतीन उदाहरणे-

**१ सोनेयाचिया — सोनया°, सोनिया°; °चिया, °चियां, °च्या, °ची. १२**

**२ यकेदेशी — एक°, °देशी, °देशिया. २५**

**३ सर्वांपरीं—सर्वां°, सर्वी°, सर्वे°, सर्व,° सर्वा°; °परीं, °परिं, °परि. ३०**

शेवटचे उदाहरण विवेचिले तर हा विचार किती गुंतागुंतीचा असतो हे दिसेल. परि शब्दयोगी अव्यय मानायचे की प्रकार या अर्थी नाम मानून त्याची विभक्ती मानायची? नाम मानल्यास मूळ रूप पर की परी? अव्यय मानल्यास तत्संबद्ध शब्दाची विभक्ति कोणती, का नुसते सामान्यरूप? विभक्ति मानल्यास तिचे रूप कोणते? हे व असे प्रश्न केवळ या स्थळावरून अनमानधपक्याने सोडविणे ठीक होणार नाही. ज्ञानदेवीमधील 'परि' या शब्दाची सर्व प्रयोगस्थले गोळा करून महानुभावीय व तत्कालीन इतर प्रयोगांशी मुकाबला पाहून मग निर्णय करावा लागेल. शब्दरूपांसंबंधीचे असे निर्णय घेण्यासाठी कोणत्याही एका प्रतीविषयी पक्षपात नसलेल्या अनाग्रही भाषाशास्त्रज्ञांची समिती करून तिच्यापुढे सर्व सामग्री ठेवणे इष्ट ठरेल.

३

गेल्या खेपेस १९ ओव्यांचा प्रास्ताविक भाग आटोपला. आता पुढे मार्गक्रमण करू.

*कृष्णातें म्हणे अवधारिलें। आपण विश्वरूप दाविलें।*
*तवं नवल म्हणोनि बिहालें। चित्त माझें॥ २१*

**तवं-तंव, तें; बिहालें-भियालें, भ्यालें.**

वास्तविक **जवं, तवं** ही जुनी रूपे. राजवाडेप्रतीतच नव्हे, शके १७०० पर्यंत नकललेल्या ज्ञानदेवीच्या पोथ्यांमध्ये ती आढळतात. अनुस्वाराचे स्थानांतर होऊन झालेली जंव, तंव त्यापूर्वी प्रचारात आली होती व ज्ञानदेवीच्या काही जुन्या पोथ्यांमध्ये (**वि, भ**) ती शिरलेली आढळतात. तरी जवं तवं ही पुष्कळ काळ टिकून राहिली. असे असता ज्ञानदेवीच्या सरकारी आवृत्तीत काही गैरसमजामुळे जंव, तंव असे छापण्यात आले. बरवा परंपरेमध्ये तवं च्या ऐवजी **तें** आहे. ही सुधारणा दिसते. तें म्हणजे विश्वरूप, असा अर्थाच्या दृष्टीने संबंध चांगला जुळतो.

**बिहालें** च्या ऐवजी **गो व** मध्ये **भियालें** आणि **रा** मध्ये **भ्यालें** आहे. ही दोन्ही, विशेषतः **भ्यालें** हे नंतरचे आहे. संस्कृत शब्दरूपांवरून प्राकृतात शब्दरूपे किंवा शब्द येत असतात, ही प्रक्रिया लक्षात घेतली म्हणजे बिहालें हे रूप सर्वात जुने हे स्पष्ट होते. सं. बिभेति-बिहेइ

–म. विहे, असे अवस्थांतर झाले. या प्रक्रियेतून जुन्या मराठीत विह् धातू बनला आणि विहाला, विहालें इ. रूपे झाली. पुढे ह् चा उच्चार मागच्या व मध्ये शिरून भिअ, भिय असा मूळ शब्द तयार होऊन भियालें आणि त्यावरून मग भ्यालें असे झाले. राजवाडे प्रतीत इतरत्र विहे, विहालें ही रूपे आली आहेत.

*यया दोन्ही जी वाटा । तुतें टाकावेया वैकुंठा ।*
*व्यक्तअव्यक्ताचां दारवठां । रिगिजे येथ ॥ २४ ॥*

**यया–या, इया, एया**

वास्तविक इ या स्त्रीलिंगी सर्वनामाचे **इया** हे अनेकवचनी जुने रूप. **या** हे नंतरचे, **दा मा स रा सा न** या प्रतींमध्ये म्हणजे एकनाथी व पाटांगण परंपरांमध्ये **या** आहे. **इया** फक्त **व** प्रतीमध्ये आहे. पूर्वीचे पाठ आवर्जून देणाऱ्या **गो** प्रतीमध्ये, **भ** प्रतीमध्ये आणि वरवा परंपरेमध्ये **यया** आहे. **इया** च्या बरोबरीने किंवा दोन टप्प्यांच्या मध्यंतरीच्या काळात हे प्रचलित होते की काय, या संभवनीयतेचा विचार व्हावयास पाहिजे. **एया** हे पुंलिंगी रूप; **वि शा** मध्ये म्ह० सिद्धनाथ परंपरेत ते दिसते.

**टाकावेया–ठाकावे [ व ] या, पावावया.**

टाक आणि ठाक या दोन धातूंचा ज्ञानदेवीच्या प्रतींमध्ये गोंधळ झालेला आढळतो. टाकणे म्ह० पोचणे, गाठणे, अधिगत करणे; ठाकणे म्ह० उभे राहणे, निश्चल राहणे, थांबणे. इथे चरण २ चा अर्थ 'हे विष्णो, तुझ्यापर्यंत पोचण्याला [ तुला अधिगत करण्याला ]' असा आहे. म्ह० इथे टाक धातूचे **टाकावेया** हे रूप आहे. **व रा** या दोन प्रतींमध्ये **ठाकावेया** असे आहे ते चूक आहे. टाक च्या ऐवजी पोथ्यांमध्ये गैरसमजाने ठाक असे लिहिले जाऊ लागले असावे; कारण टाक या धातूचा प्रचार कमी. पण ठाकावेया याचा अर्थ तर जमतो असे दिसेना; तेव्हा काही विचक्षण वाचकांनी सरळ **पावावया** हा पाठ सुरू केला असावा. तो एकनाथांनी सोपा व प्रचलित म्हणून उचलला असावा. पण **टाकावेया** हा पाठ मुख्यतया **गो** प्रतीमध्ये आणि **सा**, **भ** या महत्त्वाच्या प्रतींमध्ये आहे. प्राचीन मराठीतला हा एक सुंदर धातू आहे. अभीप्सित वस्तूप्रत उत्कंठेने जाऊन पोचणे असा अर्थ त्याने सूचित होतो.

संकोचती कमळें: पक्षिये टाकिती अविसाळें
रुक्मिणीस्वयंवर ( नरेन्द्र ) ४७६

'संध्याकाळी पक्षी उत्कंठेने घरटी गाठतात' असे हे वर्णन आहे.

*पैं जे वानि शां तुका । तेचि वेगळेया वाळा येका ।*
*म्हणोनि येकदेशि आणि व्यापका । पाडु न देखें ॥ २५*

**पाडु न देखें– सरिसा पाडु, तेतुलाचि पाडु, पाडु देखें.**

**पाडु न देखें** हा पाठ, किरकोळ फरक सोडल्यास, **गो, रा, न,** या प्रतींमध्ये आहे. पाड याचे दोन अर्थ : योग्यता, सामर्थ्य; तुलना, बरोबरी, तुल्यता. इथे वास्तविक परब्रह्माच्या एकदेशी आणि व्यापक अशा दोन्ही रूपांचे साम्य वर्णावयाचे आहे. 'पाडु न देखें'—दोन्ही रूपांमध्ये मला साम्य दिसत नाही—असा याचा उलटा अर्थ होतो, ही मोठी पंचाईत आहे. ती अभ्यासकांच्या नजरेस आल्याखेरीज कशी राहील? तिचे निवारण करण्याकरिता एकनाथी परंपरेत **सरिसा पाडु** असा पाठ आला ( **दा मा स शा** ) आणि तो पुढे खूप प्रचलित झाला. सिद्धनाथ परंपरेत **तेतुलाचि पाडु** ( **वि, का** ) असा पाठ आला. या पाठांनी अर्थ सुरेख जुळतो. पण म्हणूनच हे पाठ नंतरचे होत असे ठरते. **सरिसा पाडु** हा अर्थाला सुरेख जुळणारा पाठ काढून त्या जागी **पाडु न देखें** असा पाठ कोणी घालील हे अशक्य आहे. हा पाठ **गो रा** प्रतींत आहे एवढेच नव्हे तर **भ** प्रतीतही आढळतो. गोपाळाश्रम प्रतीचा राजवाडे प्रतीशी कदाचित पूर्वसंबंध असू शकेल. पण **भ** प्रतीशी काही संबंध असणे शक्य नाही. **गो** आणि **भ** प्रती जुळल्या की त्या पाठाचा मोठा भरवसा येतो.

मग 'पाडु न देखें' याचा अर्थ काय? असा : 'परमेश्वराच्या एकदेशी आणि व्यापक या दोन रूपांमध्ये मी तुलना करून पाहत नाही; तुलना करण्याचे मला कारण दिसत नाही ( कारण दोन्ही सारखीच मान्य ).' पू. दांडेकरांनी वाक्य प्रश्नार्थक करून निभावले आहे. मंगरूळकर–केळकरांनी पाडु म्ह० भेद असा अर्थ दिला आहे. पाड याचा भेद असा अर्थ होत नाही. त्यांनी दिलेल्या इतर दोन स्थळीही होत नाही. शिवाय भेद हा अर्थ करणे तितकेसे बरोबर नाही. ( स्वरूपाचा ) भेद आहेच, वानी एक आहे.

**सा** प्रतीने फार सोपा उपाय अवलंबिला आहे. **न** गाळून '**पाडु देखें**' असा पाठ कायम ठेवला आहे. अर्थात हा उपाय आहे, म्ह० अडचण नाहीशी करण्याकरिता केलेली सुधारणा आहे.

*तें अक्षर जी अव्यक्त । निर्दोष देशरहित ।*
*सोहंभावे उपासित । ज्ञानिये जें ॥ ३२ ॥*

( अ ) निर्दोष देशरहित–निर्देश देशरहित, निर्दोष दोषरहित, अनिर्देश देशरहित.

( आ ) ज्ञानिये–योगिये.

( अ ) आजपर्यंत छापलेल्या सर्व प्रतींमध्ये 'निर्देश देशरहित' असा पाठ आहे. राजवाडे प्रतीत तोच आहे. हा एक समास कल्पून '( जे ) दाखविता येण्याजोगे नाही व जे देशाने मर्यादित नाही' असा याचा अर्थ करण्यात येतो. हस्तलिखित प्रतीत मात्र निराळे दृश्य दिसते. **स** प्रतीत निर्देशे असे आहे. श वर मात्रा चुकून दिली गेली असावी. तेवढे वगळल्यास **निर्देश देशरहित** हा पाठ **दा मा स** प्रतींचा, म्हणजे एकनाथी परंपरेचा दिसतो. पाटांगण परंपरेत **रा** प्रत वगळल्यास इतरत्र हा पाठ दिसत नाही. **न** प्रत देखील इथे **रा** ला अनुसरत नाही. तिच्यात अनिर्देश देशरहित असा पाठ आहे व तोच **गो** आणि **व** प्रतीत आहे. निर्दोष दोषरहित असा पाठ वरवा परंपरेत सररास असून शिवाय **भ** प्रतीत आहे. **सा** ही पाटांगण परंपरेतील महत्त्वाची प्रत; तिच्यात **निर्दोष देशरहित** असे आहे.

ही ओवी पहिल्या श्लोकाच्या व्याख्यानात आली आहे. त्यात अक्षर अव्यक्त हे शब्द आले आहेत. तेच ओवीत प्रथम घालून त्या अक्षर अव्यक्त वस्तूचे अधिक वर्णन ओवीच्या दुसऱ्या चरणात स्वत:च्या पदरचे शब्द घालून ज्ञानेशांनी केले आहे. त्यांना मूळ श्लोकात आधार नाही; पण तिसऱ्या श्लोकाचे अर्थ

येत्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।

यातील 'अनिर्देश्य' या विशेषणाचा काही संस्कार या ओवीतील दुसऱ्या चरणाच्या रचनेस कारणीभूत झाला असावा.

ही रचना मुळात काय असावी याचे अनुमान करू जाता प्रथम असे लक्षात येते की **गो न** प्रतीतला **अनिर्देश** हा पाठ गीतेच्या श्लोकातील अनिर्देश्य या शब्दाचे साक्षात अनुकरण करण्याच्या बुद्धीने केलेली सुधारणा असावी. स्थूल संस्कार आणि साक्षात पुनरुक्ती यात फरक आहे. ज्ञानदेवीच्या कितीतरी प्रती पाहण्यात आल्या; पण उपर्युक्त दोनतीन प्रतींखेरीज हा पाठ कुठेही आढळला नाही. **व** प्रतीत तो समासात मागाहून लिहिलेला आहे; गोपाळाश्रमांनी तो **न** किंवा तिची पूर्वज प्रत यांवरून स्वीकारला असावा. एवंच त्याचे मूळ **न** प्रतीखेरीज कुठेही दिसत नाही. त्याचे मूळ जर खुद्द ज्ञानेशांच्या रचनेत असते तर दुसऱ्या एखाद्या परंपरेच्या किंवा **भ** सारख्या स्वतंत्र पोथीत तो रेंगाळताना दिसला असता. **निर्देश देशरहित** हा एकनाथी + **रा** मधील पाठ सयुक्तिक वाटत नाही. त्याचा अर्थ करण्याकरिता हा सर्व एक सामासिक शब्द कल्पावा लागतो. इतके करून अर्थ मोठा चांगला जुळतो असे नाही. जे कुठेही दाखविता येत नाही ते स्थलरहित आहे असे म्हणण्यात तात्पर्य उरत नाही. ते निरर्थक भासते. हा पाठ जर ज्ञानेशांचा असता तर अनेक महत्त्वाच्या प्रतींमध्ये निर्दोष हे शिरण्याचे कारण नव्हते. हे वरवा परंपरेत, **भ** प्रतीत व **सा** प्रतीत आहे. आणखी अनेकानेक पोथ्यांमधून हे आढळते. हे चालू अवलोकनावरून सांगता येते. परब्रह्माचे वर्णन करताना गीतेत निर्दोष ( ५·१९ ) हा शब्द आलेला आहे. ज्ञानदेव एका ठिकाणचे व्याख्यान करताना गीतेत इतरत्र आलेल्या कल्पनांचा व विषयांचा उपयोग करतात. तेव्हा **सा** प्रतीत आढळणारा **निर्दोष देशरहित** हा मूळ पाठ असावा असे सध्या अनुमान करण्यास हरकत नाही. **निर्दोष दोषरहित** हा पाठ पुनरुक्तीस्तव त्याज्य होय.

**ज्ञानिये–योगिये** याची चर्चा पुढील ओवीत करू. ती **योगु–योगे** याच्याशी निगडित आहे.

*तेयां आणि जी भक्तां । येयां येरयेरांमाजि अनंता ।*
*कवणें योगु तत्त्वता । जाणितला सांगैं ॥ ३३ ॥*

**योगु – योगें**

ही १२ व्या अ. च्या पहिल्या श्लोकाच्या व्याख्यानातली शेवटची ओवी आहे.

एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।
ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १

सगुण भक्त आणि अव्यक्तोपासक या दोन कोटींपैकी पहिलीला भक्त हे नाव दिले आहे; पण दुसरीला या श्लोकात नाव दिलेले नाही. तेव्हा दुसऱ्या अव्यक्तोपासनेच्या प्रकाराला नाव द्यायचे असल्यास ते देण्याची पाळी ज्ञानदेवांवर आली. ते नाव ३२ व्या ओवीच्या ४ थ्या चरणात दिले आहे. तेथे **ज्ञानिये–योगिये** असा पाठभेद आहे. **योगिये** हा पाठ पाटांगण परंपरा + **गो** प्रत यात आहे; इतर सर्वत्र **ज्ञानिये** आहे.

या ओवीत जर **योगिये** म्हटले तर पुढच्या ओवीत *कवणें योगु तत्त्वता जाणितला* असे म्हणणे अशक्य आहे. कारण योग्यांनी योग तत्त्वतः जाणिलेला असणारच हे अगदी उघड आहे. ते मुद्दाम सांगण्याची जरुरी नाही. म्हणून पाटांगण परंपरा + **गो** प्रत यांत **योगें** असा पाठ आहे ( शिवाय अ या एकाच प्रतीत तो आहे ). पण वर उद्धृत केलेल्या ओवीत **योगें** हा पाठ घालून पाहिला तर अन्वयार्थ जमत नाही असे दिसून येईल. योगें ही तृतीया असल्यामुळे जाणितला याला कर्म राहात नाही. ' तूं ' हे कर्म मानावे तर त्याकरिता क्रियापद **जाणितलासि** असे पाहिजे. तसे तर हा पाठ देणाऱ्या कोणत्याच प्रतीत नाही. असे असताही राजवाडे प्रतीच्या पुरस्कर्त्या संपादकांनी या पाठाचे समर्थन करणाचा प्रयत्न केला आहे. जाणितला याचा जाणिला गेला ( आहेस ) असा passive voice चा अर्थ त्यांनी दिला आहे. पण जाणितला हे रूप तसे नाही. साध्या भूतकाळाचे आहे. कसेही असले तरी तू हे कर्म असेल तर सि हे द्वितीयपुरुषदर्शक विकरण क्रियापदाच्या शेवटी पाहिजेच. " प्रस्तुत स्थळी ' योग जाणण्याचा ' प्रश्नच नाही " असे ते म्हणतात. पण इथे योग उत्तम जाणण्याचाच प्रश्न आहे. सगुणोपासक आणि अव्यक्तोपासक हे दोघेही योगी, योग जाणणारे होत. योग म्हणजे ईश्वरप्राप्तीचा, ब्रह्मज्ञानाचा मार्ग. 'के योगवित्तमाः' याचे ' कवणें योगु तत्त्वता जाणितला ' हे सरळ सुंदर भाषांतर आहे. तेव्हा इथे योगु हा पाठच बरोबर आहे. हे ठरले म्हणजे ३२व्या ओवीतील **योगिये** या पाठाचा पक्ष आपोआप दुर्बळ होतो. अव्यक्तोपासकांना ज्ञानदेवांनी ज्ञानी म्हणणे हे सयुक्तिक तर आहेच; पण त्या बाबतीत आणखी एक अनुमान संभवते. याच ओवीत ज्ञानदेवांनी निर्दोष हा शब्द घातला आहे; तो गीतेत ज्या ठिकाणी आहे ( ५·१९ ) त्याच्या अगोदर तिथे तीन श्लोकांत ज्ञान हा शब्द अनेकवार आला असून ज्ञानी लोकांचे उज्ज्वल वर्णन आहे ( ५·१५-१७ ). ते ज्ञानी म्ह० अव्यक्त ब्रह्मोपासकच आहेत. जसे ब्रह्माचे निर्दोष हे विशेषण तसे ज्ञानीही तेथून ( पाचव्या अध्यायातून ) इथे आले.

असे जर सगळे आहे, तर ज्ञानिये च्या ऐवजी **योगिये** आले कसे ? याचे कारण कल्पिता येते. इथे उल्लिखिलेले जे अव्यक्तोपासक त्यांची उपासना कशी असते त्याचे ज्ञानदेवांनी पुढे विस्तृत वर्णन केले आहे ( ४०–५८ ). कुंडलिनी जागृत करून सिद्धी प्राप्त करून घेण्याचा जो हठयोगाचा मार्ग त्याचेच हे वर्णन आहे आणि त्याला ज्ञानेशांनी योग म्हटले आहे ( ५७,५९ ). सर्वसामान्य प्रचलित भाषेत आसनबंधादि द्वारा कुण्डलिनी जागृत करण्याची जी प्रक्रिया तिलाच योग म्हटले जाते. या वस्तुस्थितीमुळे अव्यक्तोपासना = हठयोग = योग असे समीकरण काही ज्ञानदेवीवाचकांच्या मनात तयार झाले आणि *ज्ञानिये* ऐवजी *योगिये* हा पाठ काही ठिकाणी शिरला. तेव्हा ३३ ओवीमधील **योगु** बदलणे प्राप्त झाले. त्यांना असे आढळले की आसनबंधादि मार्गाला ज्ञानदेव योग म्हणतात तसे भक्तीलाही ते योग म्हणतात ( ३९, १५७, २२८ इ० ). दोन्ही योगच. म्हणून कवणें योगें असा त्यांनी पाठ केला. "दोहोंपैकी कोणत्या योगाने" असा अर्थ आला व हे चांगले जमले. पण तिकडे *योगिये* या पाठाशी विसंगति उत्पन्न झाली आणि जाणितला हे क्रि० उघडे पडले. मागाहून केलेली काटघाल कुठेतरी उघडी पडतेच.

( पुढे चालू )

• • •

# हिंदी रंगभूमि-शतवार्षिकी महोत्सव

• प्रभुदास भुपटकर •

साधारणपणे हिंदी भाषी साहित्यक्षेत्राच्या बाहेर सर्व लोकांची अशी समजूत आहे कीं, हिंदीला रंगभूमी नावाची वस्तू कधी लाभलीच नाही. ही भावना एका विशिष्ट अर्थाने सत्यही पण आहे. कारण कायम स्वरूपाची आणि सातत्यशील अशी रंगभूमी हिंदीजवळ आरंभकाळीही नव्हती आणि दुर्दैवाने आजही नाही. पण या म्हणण्याचा अर्थ असा नव्हे की, हिंदी भाषेत कधी नाटके लिहिलीच गेली नाहीत; किंवा त्यांचे रंगभूमीवर कधी प्रयोगही झाले नाहीत; तसंच म्हटलं तर कायम स्वरूपाची सातत्यशील रंगभूमी नसताना देखील हिन्दीचे साहित्यकार ज्या विपुल संख्येने नाटके लिहीत आहेत, त्याबद्दल त्यांचे खरोखरीच कौतुक करावयास हवे! मराठी रंगभूमीला ज्या वेळी अवनत कळा प्राप्त झाली, त्यावेळो मराठीचे साहित्यकार नाटक लिहिण्यापासून विमुख होऊ लागले. नाट्यप्रतिभासंपन्न लेखकांना चित्रपटाचे क्षेत्र मिळाले. गडगंज पैसा डोळ्यासमोर दिसू लागला, मग २५ रुपये अथवा ५० रु. मानधनासाठी नाटक लिहिण्याचा खटाटोप उगीच कोणी का करावा? अशीही वृत्ती काही मराठी लेखकांमध्ये दिसून आली. अशा प्रकारची प्रवृत्ती हिंदी नाटककारांमध्ये दिसत नाही. कदाचित ते नाटकाला मराठी लेखकांप्रमाणे रंगभूमी–सापेक्ष मानत नसावेत.

आज हिंदी साहित्य-जगतात हिंदी रंगभूमीचा जो शत-सांवत्सरिक महोत्सव साजरा केला जात आहे, त्याचे कारण म्हणजे हिंदीतील पहिले स्वतंत्र (मौलिक) नाटक ६ एप्रिल १८६८ रोजी बनारस थिएटरमध्ये सादर करण्यात आले. या नाटकाचे नाव होते— 'जानकी मंगल' आणि लेखक होते आधुनिक हिंदी साहित्याचे प्रणेते भारतेन्दु हरिश्चंद्र यांचे स्नेही 'पं. शीतलाप्रसाद त्रिपाठी'! हिंदी रंगभूमीचा हा अशा प्रकारे आरंभ झाला. या आरंभाबाबतही मराठी मनाला अभिमान वाटावा अशी एक घटना घडलेली आहे. ती घटना अशी की, पं. शीतलाप्रसाद त्रिपाठींना 'जानकी मंगल' हे नाटक लिहिण्याची प्रेरणा मराठीचे आद्य नाटककार श्री. विष्णुदास भावे यांनी १८५३ साली लिहिलेल्या 'गोपीचंदाख्यान' या हिंदी नाटकामुळे मिळाली. हिंदी नाट्यसाहित्याच्या इतिहासात वरील गोष्टीचा जरी उल्लेख असला, तरी पं. शीतलाप्रसाद त्रिपाठींनी हे नाटक केव्हा आणि कोठे पाहिले याचा मात्र उल्लेख मिळत नाही.

मराठी रंगभूमीची सुरुवात ही जशी एतद्देशीय कानडो रंगभूमीवरील नाट्यप्रयोग पाहून झाली, त्याप्रमाणे हिंदी रंगभूमीची सुरुवात मात्र एतद्देशीय कुठल्याही भाषेच्या अनुकरणाने झाली नाही. १८५० च्या आसपास मुंबई, मद्रास, कलकत्ता येथे विद्यापीठे स्थापन झाली, आणि इंग्रजीच्या अभ्यासक्रमात शेक्सपियरचा समावेश अनिवार्य रीतीने झाला. भारतीय जनतेची शेक्सपियरशी ओळख होण्याचे कारण म्हणजे वरील तीन प्रमुख शहरांत जी इंग्रज मंडळी नोकरी अथवा व्यवसायनिमित्ताने स्थायिक झालेली होती, ती मंडळी स्वतःच्या करमणुकीसाठी अधूनमधून शेक्सपियरच्या नाटकांचे प्रयोग करीत असत हे होय! या इंग्रजी रंगभूमीचा विकास सुरुवातीला कलकत्त्याला आणि त्यानंतर मुंबईला झाला. हिंदी रंगभूमी जी जन्माला आली, ती या इंग्रजी रंगभूमीच्या अनुकरणाच्या प्रेरणेने!

हिंदी रंगभूमी निर्माण करणारे देखील हिंदीभाषी लोक नव्हते, तर ते पारसी व्यावसायिक होते. त्यांचे ध्येय नाटकाचा व्यवसाय करून पैसा मिळवणे हे होते. हिंदी रंगभूमी जी अंकुरली ती मुख्यत्वेकरून पारसी थिएट्रिकल कंपन्यांच्या द्वारा! मुंबईतील अशा नाटक मंडळ्यांमध्ये प्रमुख नाटक मंडळ्या होत्या—'ओरिजिनल थिएट्रिकल कंपनी' (१८७०), 'व्हिक्टोरिया थिएट्रिकल कंपनी' (१८७७), 'आल्फ्रेड थिएट्रिकल कंपनी' (१८७७), आणि 'न्यू आल्फ्रेड कंपनी'. या प्रत्येक नाटकमंडळीने आपापल्या पदरी एक अथवा अनेक नाटककार बाळगलेले असत. आणि मंडळीकरिता या नाटककारांकडून नाटके लिहून घेतली जात. ओरिजिनल थिएट्रिकल कंपनीकडे मुहम्मद मियाँ 'रौनक' आणि हुसेनमिया जरीफ, व्हिक्टोरिया

अनुक्रमणिका







थिएट्रिकल कंपनीमध्ये मुन्शी विनायक प्रसाद 'तालीब', आल्फ्रेड थिएट्रिकल कंपनीमध्ये सय्यद मेहदीहसन 'एहसान' आणि पं. नारायण प्रसाद 'बेताब', न्यू आल्फ्रेड कंपनीमध्ये आगा मोहम्मद हश्र काश्मीरी हे नाटककार होते. मंडळीच्या मागणीनुसार हे नाटककार नाटके लिहीत. नाटकाचे ध्येय मनोरंजन होते. रंगभूमीवर काहीतरी अद्भुत दिसावे ही प्रेरणा होती. कपड्यांचा झगझगाट, दागिन्यांचा लखलखाट, दृश्यचमत्कार, नृत्य आणि संगीत यांची लयलूट हे ह्या नाटकांचे विशेष होते. नाटकांकरिता जे विषय निवडले जात, ते बहुतांशी अरबी भाषेतील सुरस आणि चमत्कारिक गोष्टींमधून निवडले जात! क्वचित प्रसंगी रामायण, महाभारत यांना हात घातला जाई! शेक्सपियरची नाटके अनुवादित करून कधीमधी तीही सादर केली जात. ह्या काल्पनिक, अद्भुत, चमत्कृतिप्रधान नाटकांच्या युगांत एकच नाटक वास्तविकतेचे अथवा यथार्थवादाचे दर्शन घडविणारे आपणांस मिळते. ते म्हणजे अलेक्झांड्रिया कंपनीचे श्री. नय्यर या गृहस्थांनी लिहिलेले 'वतन' हे नाटक होय! या नाटकामध्ये राष्ट्रीय भावना ही प्रमुख आहे. या नाटकातला "मकाँसे बाहर मकानवाले खडे हुए हैं" हा शेर वीर वामनराव जोशांच्या 'रणदुंदुभि' या नाटकातील 'असूनि खास मालक घरचा 'म्हणति चोर त्याला' या ओळींची आठवण करून देतो!

वरील नाटकमंडळ्यांची भ्रष्ट अभिरुचीने समृद्ध असलेली नाटके पाहून कांही मंडळींच्या ठिकाणी एक अभीष्ट प्रतिक्रियाही झाली. आणि भाषेच्या दृष्टीने शुद्ध हिन्दी भाषेत लिहिलेल्या नाटकांचे प्रयोग करणे आणि रंगभूमीवरील प्रदर्शनातील कुरुची, भोंगळपणा आणि बीभत्सता टाळण्याचा प्रयत्न करणे ह्या ध्येयाने प्रेरित होऊन दोन नाटक मंडळ्या स्थापन झाल्या. एक काठेवाडची 'सूर-विजय नाटक मंडळी' आणि दुसरी मेरठची 'व्याकुळ भारत नाटक मंडळी'! नाटकमंडळ्यांच्या ह्या नावातूनच ह्या संस्थांची भाषाविषयक अभिरुची प्रत्ययाला येते. 'सूर विजय मंडळी' पं. राधेश्याम कथावाचक ह्यांचे 'उषा-अनिरुद्ध' हे नाटक करीत असे आणि 'व्याकुल भारत' ह्या संस्थेची बुद्धदेव (ले. विश्वंभर सहाय व्याकुल), सम्राट चंद्रगुप्त, तेग ए-सितम (ले. जनेश्वर प्रसाद सायल) ही नाटके प्रसिद्ध होती. ह्या दोन नाटकमंडळ्यांनी रंगभूमीमध्ये जी सुधारणा घडवून आणली ती तडजोड स्वरूपाची होती. उर्दू थिएट्रिकल मंडळींच्या व्यावसायिक सफलतेला कारणीभूत झालेल्या गोष्टी या संस्थांनी आत्मसात केल्या होत्या. पण त्या गोष्टींना वळण मात्र मध्यभिरुचीचे दिले होते. उदाहरणच सांगावयाचे झाले तर उर्दू भाषेतील खटके-लटके, शक्य तितके आपल्याही पात्रांच्या संभाषणात आणण्याचा हे नाटककार प्रयत्न करीत. पण भाषा मात्र शुद्ध हिन्दी ठेवीत. या प्रयत्नाचे हिन्दी साहित्यिकांकडून अनुकरण झाले असते, तर कदाचित हिंदीला योग्य आणि आवश्यक अशी व्यावसायिक रंगभूमी मिळाली असती. पण दुर्दैवाने तसे होणे नव्हते. आणि म्हणूनच व्यावसायिक रंगभूमीवर प्रचलित असलेल्या थिएट्रिकल नाटकांचा हिन्दी साहित्यिकांकडून अकारण उपहास मात्र केला गेला. आणि या थिएट्रिकल नाटकांचा विटाळही नको म्हणून साहित्यिक नाटकांचा स्वतंत्र संसार थाटला गेला. साहित्यिक नाटकांच्या या संसाराच्या निमित्ताने हिन्दीमधील अव्यावसायिक अथवा हौशी नाट्य चळवळीचा पाया घातला गेला.

रंगभूमीच्या स्थापनेविषयी अव्यावसायिक प्रयत्न करणाऱ्यांमध्ये आधुनिक हिन्दी साहित्याचे जनक म्हणून ज्यांना ओळखण्यात येते, ते बाबू भारतेन्दु हरिश्चंद्र अग्रणी होते. भारतेंदूंचे लोकजागृतीचे प्रयत्न हे तत्कालीन (१९ व्या शतकाचा उत्तरार्ध) महाराष्ट्रीय समाजधुरीणांच्या प्रयत्नांसारखेच होते. भारतेंदूंचे कार्य हे बरेचसे आगरकरांच्या कार्यासारखे होते. म्हणजे असे की, आगरकरांप्रमाणेच भारतेंदूंचा भरही सामाजिक सुधारणेकडे आणि स्त्रीशिक्षणाकडे जास्त होता. तत्कालीन महाराष्ट्रीय पुढाऱ्यांनी ज्याप्रमाणे नाटकांकडे लोकजागृती आणि लोकशिक्षणाचे प्रमुख साधन म्हणून पाहिले. बंगालीतील अथवा संस्कृतमधील उत्तम नाटके अनुवादित करणे, स्वतंत्र नाटके लिहिणे, नाटकांचे प्रयोग करणे आणि स्वतः भूमिका देखील करणे ह्या गोष्टी भारतेंदूंनी त्याच बुद्धीने केल्या. नाट्यसंस्था सुरू करावयाला जो प्रसंग भारतेंदूंच्या आयुष्यात घडला, त्याचाही इथे उल्लेख करायला हवा. स्वतः भारतेंदु आणि त्यांचे काही सन्माननीय मित्र हे एका थिएट्रिकल कंपनीच्या 'शाकुंतल' नाटकाच्या प्रयोगास गेले. नाटकातील शकुंतला जेव्हा एखाद्या छचोर नर्तकीप्रमाणे कमर बाकबीत आणि डोळे मिचकावीत रंगभूमीवर प्रविष्ट झाली, त्यावेळी भारतेंदु आणि त्यांच्याबरोबर त्यांचे सन्मान-

नीय पाहुणे हे उद्वेगाने नाट्यगृहातून बाहेर पडले. आणि भारतेंदूंनी सुसंस्कृत आणि सदभिरुचिसंपन्न नाटके करण्यासाठी म्हणून स्वतंत्र नाट्यसंस्थेची स्थापना करण्याचा निश्चय केला. भारतेंदूंच्या या प्रयत्नांमध्ये पं. माधव शुक्ल, बाबू राधाकृष्णदास आणि गोविंदशास्त्री दुगवेकर हे सहभागी होते. साहित्यिक नाटकांना रंगभूमीवर प्रतिष्ठा आणि लोकप्रियता मिळवून देण्याचा प्रयत्न करणारी पहिली अव्यावसायिक नाट्यसंस्था श्रीरामलीला नाटकमंडळी १८९८ साली स्थापन झाली. हिचे कार्य १९०७ पर्यंत चालू होते. या संस्थेचे नेतृत्व पं. माधव शुक्ल यांच्याकडे होते. हे स्वतः नाटककारही होते आणि अभिनेता पण होते. 'रामलीला नाटक मंडळी' ह्या नावामागे एक विशिष्ट हेतू प्रत्ययास येतो. रामलीला हे धार्मिक भूमिकेवर अधिष्ठित असे लोकनाट्य स्वरूपाचे, लोकरंजनाचे साधन आहे. आजही काशी, अलाहाबाद वगैरे ठिकाणी रामलीला करणारी अनेक पथके अस्तित्वात आहेत. 'अभिजात नाटक कला' ही लोकनाट्यकलेपासून पूर्णतया विच्छिन्न नसावी या भावनेनेच कदाचित रामलीला नाटकमंडळी हे नाव घेतले गेले असावे. या नाटकमंडळीचा उद्देश मराठीतील खाडिलकरांच्या नाटकांच्या स्वरूपाचा होता. खाडिलकरांनी ज्याप्रमाणे वर्तमान राजकारणाची चर्चा करण्यासाठी पौराणिक नाट्यप्रसंग निवडले, त्याचप्रमाणे रामायणातील प्रसंगांमधून वर्तमान राजकारणावर मर्मप्रहार करणे हे श्रीरामलीला नाटकमंडळीचे ध्येय होते.

पं. माधव शुक्ल यांच्या 'सीता-स्वयंवर' या नाटकामध्ये शिवधनुष्य-भंगाचा प्रसंग आहे. त्या प्रसंगी शिवधनुष्याचा ब्रिटिश नोकरशाहीचें प्रतीक म्हणून वापर करण्यात आलेला आहे.

विसाव्या शतकाच्या पहिल्या दोन दशकांत ज्या हौशी नाट्यसंस्थांनी हिन्दी रंगभूमी जिवंत ठेवली, त्या म्हणजे 'हिन्दी नाट्य समिती' (१९०८), 'भारतेंदु नाटक मंडळी', 'नागरी नाट्यकला प्रवर्तन मंडळी' (१९०९) आणि 'काशी नागरी नाटक मंडळी' या होत. 'महाराणा प्रताप' 'सत्य हरिश्चंद्र', 'सम्राट अशोक', 'भक्तसूरदास', 'सुभद्राहरण', ही नाटके या काळात लोकप्रिय झाली. यांपैकी 'सुभद्राहरण' हे एका महाराष्ट्रीय वृत्तपत्रकाराने लिहिलेले नाटक आहे. त्यांचे नाव श्री. गोविन्दशास्त्री दुगवेकर! राजकारणात हे गृहस्थ लोकमान्य टिळकांचे अनुयायी! हिन्दीला वृत्तपत्रकलेची देणगी ज्या महाराष्ट्रीय व्यक्तींनी दिली त्यांमध्ये श्री. गोविन्दशास्त्री दुगवेकर यांचा समावेश अवश्य करावा लागेल. हे केवळ नाटके लिहितच नसत, तर ते काशी नागरी नाटक मंडळीचे तालीम-मास्तरही होते आणि स्वतः भूमिकाही करीत. यांनी लिहिलेल्या दोन-तीन नाटकांवर तत्कालीन मराठी नाटकांचा प्रभाव फार मोठया प्रमाणात आढळतो. कदाचित 'सुभद्राहरण' हे कै. अण्णासाहेब किर्लोस्कर यांच्या सौभद्रावरून लिहिले गेले असावे.

हिन्दी रंगभूमीचा पाया घालणारे भारतेंदु हरिश्चंद्र हे दुर्दैवाने अल्पायु ठरले, आणि त्यानंतर हिन्दी नाट्यसाहित्य समृद्ध करण्याची ज्यांनी जबाबदारी उचलली, ते रंगभूमीविषयी नितांत उदासीन राहिले! भारतेंदुनंतर हिन्दी नाट्यसाहित्य समृद्ध केले —जयशंकर प्रसादांनी! पण दुर्दैवाने प्रसादांनी शुद्ध साहित्यिक दृष्टिकोणातून नाटके लिहिली. रंगभूमीबद्दल त्यांना कोणत्याच प्रकारचे आकर्षण नसल्यामुळे नाटक लिहिताना रंगभूमीच्या काही मर्यादा सांभाळाव्या लागतात याची त्यांनी कधी दखलही घेतली नाही. काशीतील काही उत्साही नवयुवकांनी प्रसादांच्या नाटकांच्या साहित्यगुणांनी आकृष्ट होऊन त्यांची नाटके रंगभूमीवर आणण्याचा प्रयत्न केला, पण या मंडळींना देखील प्रसादांकडून जे सहकार्य अपेक्षित होते ते मिळाले नाही. त्यामुळे पृथ्वीराज कपूर यांनी 'पृथ्वी थिएटर्स' ही संस्था स्थापून हिंदी रंगभूमी पुन्हा चालू करीपर्यंत हिंदीला रंगभूमि अशी नव्हतीच. पृथ्वीराज कपूर यांनी पृथ्वी थिएटर्सद्वारे 'दीवार,' 'पठाण,' 'आहुति,' 'गद्दार,' 'पैसा,' 'कलाकार' आदि नाटके सादर केली. या नाटकांना जी लोकप्रियता लाभली, त्यामागे पृथ्वीराज कपूर यांच्या भव्य व्यक्तिमत्वाचे आकर्षण होते. ही नाटके पुष्कळशी प्रचारकी थाटाची होती. अत्यंत यथार्थवादी दृश्य रंगभूमीवर मांडण्याकडे पृथ्वीराजांचा कल होता. 'पृथ्वी थिएटर्स'चे एक ऋण मात्र हिन्दीच नव्हे, तर भारतीय रंगभूमीलादेखील मान्य करावे लागेल. कसोशीने तालमी घेऊन बसवलेला नेटका नाट्यप्रयोग आणि अभिनयात कमालीची स्वाभाविक सहजता हे ते ऋण होय.

सध्या जी हिन्दी रंगभूमी अस्तित्वात आहे, तिचे श्रेय काही हौशी नाट्यसंस्थांना द्यावयास हवे. सध्याच्या हिंदी रंगभूमीची केंद्रे कानपूर, पाटणा, वाराणशी, कलकत्ता,

लखनौ, दिल्ली ही होत. ह्या सर्व केंद्रांत लखनौची नाट्य-परंपरा ही सर्वांत जुनी म्हणावी लागेल. लखनौमध्ये १९०२ सालापासून निरनिराळ्या हौशी नाट्यसंस्थांच्या द्वारे नाटके केली जात आहेत. लखनौची 'प्रबोधिनी परिषद' ही आद्य नाट्यसंस्था होय. तिची स्थापना १९०२ साली झाली. इंडियन रेल्वे इन्स्टिट्यूट क्लबने १९३२ साली नाट्यगृह बांधले. १९५३ साली अमृतलाल नागर यांनी 'लखनौ रंगमंच' ह्या संस्थेची स्थापना केली आणि फिरता रंगमंच लखनौमध्ये सुरू केला. अमृतलाल नागर यांनी अगदी अलीकडे पद्मश्री पु. ल. देशपांडे यांच्याप्रमाणे एकपात्री नाट्यप्रयोगही स्वतः सादर केलेले आहेत. आज ज्या हौशी नाट्यसंस्था कार्यशील आहेत, त्यांमध्ये 'नाट्यभारती, कानपूर; बिहार आर्टस् थिएटर, (पाटणा); अनामिका, बहुरुपी; नांदीकार मंडळी, (कलकत्ता); श्री आर्टस क्लब, दिल्ली आर्ट थिएटर, लिटल् थिएटर ग्रुप, इंद्रप्रस्थ थिएटर, यात्रिक आणि राष्ट्रीय नाट्य विद्यालय (दिल्ली) या संस्थांचा प्रामुख्याने उल्लेख करावयास हवा सर्वांत उत्कृष्ट कार्य कलकत्त्याची अनामिका, आणि दिल्लीचे राष्ट्रीय नाट्य विद्यालय ह्या संस्था करीत आहेत.

सध्या हिंदी रंगभूमीवर सर्वांत अधिक लोकप्रियता जर कोणी मिळवली असेल, तर ती नाटककार श्री. ज्ञानदेव अग्निहोत्री यांनी! यांची बहुतेक नाटके ही चिनी अथवा पाकिस्तानी आक्रमणाशी संबद्ध अशी नाटके आहेत. याची साक्ष त्यांची 'वतनकी आबरु' आणि 'नेफा की एक श्याम' ह्या दोन नाटकांद्वारा मिळते. अलीकडेच त्यांनी 'शुतुर्मुर्ग' नावाचे एक प्रतीक-नाटकही लिहिले आहे. यामध्ये भारतीयांची आत्मलीनवृत्ती आणि तद्नुषंगिक बाह्य यथार्थ विस्मृती यावर प्रहार केलेला आहे. नाटकातील प्रतीकात्मकता उत्कृष्टपणे सांभाळली जाऊन ही नाटकाच्या शेवटी राजाला आपण सर्व सचेतन शुतुर्मुर्ग आहोत हे सांगणे भाग पडले आहे. हा फार मोठा दोष ह्या नाटकात दिसून येतो. यानंतर त्यांनी आपली दृष्टी नाट्यविषयासाठी इतिहासाकडे वळविली असून सेनापती तात्या टोपे यांच्या जीवनावर नाटक लिहिले आहे. श्री. ज्ञानदेव अग्निहोत्री केवळ नाटककारच नव्हेत, तर दिग्दर्शक आणि अभिनेता पण आहेत.

दुसरे लोकप्रिय नाटककार म्हणजे 'मोहन राकेश' हे होत. यांची दोन नाटके 'आषाढ़का एक दिन' आणि 'लहरोंके राजहंस' ही रंगभूमीवर यशस्वी झालेली नाटके आहेत. चिनी आक्रमणाच्या पार्श्वभूमीवर बनारसचे प्रो. डॉ. शिवप्रसाद सिंह यांनी 'घाटियां गूँजती हैं' हे नाटक लिहिलेले आहे. श्री. ज्ञानदेव अग्निहोत्री यांच्या 'नेफा-की एक शाम' या नाटकात उत्कृष्ट प्रसंग सौंदर्य आपणास लाभते, तर डॉ. शिवप्रसाद सिंह यांच्या नाटकात प्रसंग-सौंदर्याबरोबरच तत्त्वविवेचनाचे सौंदर्यही अनायासे मिळते.

रंगभूमीचा अनुभव असला की, हिंदी नाटककार किती उच्च कोटीचे कलासौंदर्य निर्माण करू शकतो याची प्रतीती श्री. जगदीशचंद्र माथुर यांची 'कोणार्क' आणि 'शारदीया' ही नाटके वाचल्याने आपणास येते. 'कोणार्क' मध्ये ग्रीक ट्रॅजेडीसारखे ओतप्रोत कारुण्य भरण्यात श्री. जगदीशचंद्र माथुर यांना अपूर्व यश मिळालेले आहे. 'शारदीया' ह्या नाटकाचा विषय महाराष्ट्रीय इतिहासाशी संबद्ध आहे. खर्ड्याच्या लढाईच्या वेळी सर्जेराव घाटगे या दुर्जनाने राजकीय स्वार्थासाठी आपली मुलगी बायजाबाई हिचे लग्न ग्वाल्हेरच्या शिंद्याशी लावून दिले. बायजाबाईच्या प्रियकराला जिवंतपणी मृताचे आयुष्य कंठावे लागले. हा प्रियकर पेशव्यांचा गुप्तहेर असून तो हैद्राबादच्या निजामच्या दरबारी हेर म्हणून राहात होता. तेथे तो विणकराची कला शिकला. ग्वाल्हेर किल्ल्याच्या अंधारकोठडीत आजीवन कारावासाचे आयुष्य भोगीत असता त्याने जी साडी विणली ती आजही नागपूर म्युझियममध्ये सुरक्षित आहे. या कथाभागावर जगदीशचंद्र माथुर यांनी नाटक लिहून 'काव्येषु नाटकं रम्यम्' ह्या उक्तीची प्रचीती आणून दिलेली आहे.

वरील मौलिक नाटकांपेक्षाही अधिक संख्येने हिन्दी रंगभूमीवर अनुवादित नाटके केली जात आहेत. बंगाली ही शेजार-भाषा असल्यामुळे त्यामधील पुष्कळशी नाटके अनुवादित करून त्यांचे प्रयोग केले जात आहेत रवींद्रनाथ ठाकूर यांची नाटके, किंवा आधुनिक कांचन-मृग, विप्लवी, जली-खिचडी ही बंगाली नाटके हिन्दी रंगभूमीवर सादर केली जात आहेत. मराठीमधील पुढील नाटके अनुवादित स्वरूपात हिन्दी रंगभूमीवर अभिनीत केली गेलेली आहेत. दूरचे दिवे (शिरवाडकर), लग्नाची बेडी (आ. अत्रे), जगन्नाथाचा रथ (गो. नी. दांडेकर), जुगार (मुक्ताबाई दीक्षित), तुझे आहे तुजपाशी आणि अंमलदार (पु. ल. देशपांडे), एक शून्य बाजीराव (श्री. चिं त्र्यं खानोलकर), प्रेमा तुझा रंग कसा?

आणि रायगडाला जेव्हा जाग येते! (प्रा. वसंत कानेटकर). कानडीमधील 'सुनो जनमेयज' हे नाटकही हिन्दी रंगभूमीवर प्रयोगरूपाने अवतरित झालेले आहे.

भारतीय भाषांच्या जोडीला परदेशी भाषांतील अनुवादित नाटकांचेही प्रयोग हिन्दी रंगभूमीवर केले गेले आहेत आणि जात आहेत. गेल्या काही वर्षांत इंग्रजीमधील जी नाटके हिन्दी रंगभूमीवर करण्यात आली, त्यांपैकी काही पुढीलप्रमाणे–ऑथेल्लो (शेक्सपियर), पिग्मॅलियन (शॉ), ग्लास मिनेजरी आणि डेथ ऑफ ए सेल्समन (टेनेसी विल्यम्स), दि मायझर, आणि दि स्कॉर्पियन (मोलियर) आणि माऊस ट्रॅप (अॅगाथा ख्रिस्ती) पाप और प्रकाश (टॉलस्टॉय) प्रेत (इब्सेन) 'माऊस ट्रॅप' या नाटकाच्या अनुवादावरून हे लक्षात येईल की, ज्याप्रमाणे मराठी प्रेक्षकांची रुची अलीकडे रहस्यकथांकडे वळली आहे, त्याप्रमाणे हिंदी जनताही रहस्यकथामध्ये रस घेऊ लागली आहे.

स्थायी रंगभूमीची परंपरा नसल्यामुळे संपूर्ण नाटकांपेक्षा एकांकी नाटकांचे प्रयोग हिंदी नाट्यप्रेमीयांना अधिक मानवतात. शाळा, महाविद्यालये, किंवा इतर संस्था संमेलनप्रसंगी एकांकी नाटकांचे प्रयोग करणे श्रेयस्कर समजतात. त्यामुळे हिंदीमध्ये एकांकी नाटकसाहित्य अत्यंत समृद्ध आणि समुन्नत आहे.

मराठीतील तमाशाप्रमाणे 'नौटंकी' या स्वरूपाचे लोकनाट्य आजही हिंदीमध्ये प्रचारात आहे. तमाशावर चांगले संस्कार घडवून बहुजनसमाजाचे रंजन आणि शिक्षणसाधन म्हणून लोकनाट्यस्वरुपात सादर करण्याचा जो प्रयत्न पद्मश्री पु. ल. देशपांडे यांनी केला, तशाच प्रकारचा प्रयत्न पाटण्याचे प्रो. रामस्वरूप काश्यप यांनीही केलेला आहे. आणि ते त्यात सफलही झालेले आहेत. लोहासिंह ह्या केंद्रवर्ती भूमिकेभोवती त्यांनी अनेक लोकनाट्यांचे जाळे विणले असून स्वतः लोहासिंहाची भूमिका करीत असतात. त्यांची ही भूमिका इतकी लोकप्रिय झालेली आहे की, त्यांना विहारमधील जनता 'लोहासिंह' या नावानेच ओळखते.

हिंदी जगतामध्ये आज जी नाट्यविषयक चळवळ चालू आहे, जे नाट्यप्रयोग सादर केले जात आहेत, आविष्काराची आधुनिकतम साधने अवलंबिली जात आहेत, त्यावरून हिंदी रंगभूमीला नजीकच्या भविष्यात चांगले दिवस येणार आहेत, असे मानावयास मुळीच हरकत नाही. हिन्दी रंगभूमीची जन्मशताब्दी साजरी करीत असता जर स्थायी आणि सातत्यशील अशा रंग-भूमीची मुहूर्तमेढ रोवली गेली, तर तो भाग्याचा क्षण म्हणावा लागेल. आणि आज ना उद्या हिंदी माध्यमाद्वारे भारतीय रंगभूमी मूर्त स्वरूपात पाहण्याचे स्वप्न साकार झाल्याचे भाग्य नाट्यप्रेमी रसिकांच्या नेत्रांना लाभेल आणि ते 'सफल–मनोरथ' होतील.

• • •

# लोकहितवादींच्या विचारातील महत्त्वाचे परिवर्तन*

मा. प. मंगुडकर

लोकहितवादींच्या या पुस्तकाचे पहिले वैशिष्ट्य असे की ग्रामरचनेवर प्रकाशित झालेले मराठी साहित्यातील हे सर्वांत जुने पुस्तक आहे. आतापर्यंत श्री. त्रि. ना. अत्रे यांचे 'गांवगाडा' हेच पुस्तक या विषयावरील सर्वांत जुने पुस्तक मानले जाई. परंतु लोकहितवादींचे ग्रामरचना हे पुस्तक गावगाड्याच्या आधी सुमारे ३०–३२ वर्षे प्रकाशित झालेले आहे. लोकहितवादींच्या या पुस्तकामध्ये प्रामुख्याने १८५० ते १८८० या काळातील ग्रामीण जीवनातील आर्थिक, सामाजिक परिस्थितीचे वर्णन आहे. त्याचप्रमाणे खेड्यापाड्यांतील कारभारयंत्रणा, त्या काळातील न्यायदान यंत्रणा या संबंधीच्या प्रश्नांची चर्चा केली आहे. खेड्यातील समाजशास्त्र, प्रशासन यंत्रणा शेतीचे अर्थशास्त्र यासंबंधी माहिती देणारे मराठीतील सर्वांत जुने पुस्तक म्हणून या पुस्तकाचे विशेष महत्त्व आहे. त्याचप्रमाणे ही सर्व माहिती लेखकाच्या स्वतःच्या अवलोकनावर, अनुभवावर आधारलेली असल्याने या माहितीला आणखी विशेष महत्त्व आहे. लोकहितवादींचे आयुष्य १८५२ पासून १८८० पर्यंत प्रामुख्याने खेड्यातच वा खेड्यातील प्रश्नांची सोडवणूक करण्यात गेले. अहमदाबाद येथील मध्यंतरी १० वर्षांचा काळ सोडल्यास लोकहितवादींचा सर्व काळ महाराष्ट्रात विशेषतः पश्चिम महाराष्ट्रात गेला. मुन्सफ, असिस्टंट जज्ज, ॲक्टींग जज्ज, जॉइंट जज्ज अशा जागांवरून लोकहितवादींनी न्यायदानाचे काम केल्यामुळे खेड्यापाड्यांतील परिस्थितीचे चित्र त्यांच्यासमोर स्पष्ट होते. प्रत्यक्ष अनुभूतीतून ग्रामजीवनाचे हे चित्र उतरलेले असल्याने या माहितीचे महत्त्व असाधारण आहे. लोकहितवादींच्या पोटात खेड्यापाड्यातील गांजलेला शेतकरी, कातकरी, शेतमजूर यांच्याबद्दल अथांग सहानुभूती असल्याने या सर्व वर्णनामध्ये जिवंतपणा निर्माण झाला आहे.

या पुस्तकाचे दुसरे वैशिष्ट्य असे की, लोकहितवादींच्या जीवनामध्ये आयुष्याच्या शेवटी शेवटी जे स्थित्यंतर झाले त्याचे स्वच्छ प्रतिबिंब या पुस्तकामध्ये पडलेले आहे. शतपत्रातील लोकहितवादी व ग्रामरचनेमधील लोकहितवादी यांच्यामध्ये पुष्कळ फरक आहे. शतपत्रातील लोकहितवादी इंग्रजी राज्याचे मुक्त मनाने स्वागत करीत असून आपल्या समाजरचनेतील दोषाबद्दल कठोर आत्मटीका करीत आहेत. इंग्रजी राज्याचे स्वागत करताना ते आपल्या शतपत्रात म्हणतात, " आता सर्व भरतखंड इंग्रजांचे अंमलात गेले. या गोष्टी ईश्वराने चांगलेपणाकरिताच योजिल्या असे मला वाटते." ( पान ६–७ ), " हिंदु लोकांमध्ये मूर्खपणा वाढला, तो दूर होण्याकरिताच हे गुरु दूर देशातून इकडे ईश्वराने पाठविले आहेत. " ( पान ३३ ), " ईश्वराने या देशात इंग्रजांची प्रेरणा केली आहे. " इंग्रज हेच सुधारलेले चांगले लोक आहेत. यांचे राज्य या देशात आहे, हेच चांगले व ईश्वराने हे आम्हांस चांगले राजे दिले आहेत हे खचित दिसते. याहून चांगले राजे आम्हांस कदापि मिळणार नाहीत. याशिवाय हे सरकार लोकांची सुधारणा करण्याकरिता अत्यंत मेहनत करीत आहे. त्यास विद्या शिकविते, तेही अशा रीतीने शिकविते की लोकास जुलूम वाटू नये " ( पान ५७ ).

आयुष्याच्या प्रारंभी इंग्रजी राज्य हे ईश्वरी वरदान आहे अशी लोकहितवादींची धारणा होती. शतपत्रातून त्यांनी आपली ही भूमिका अनेक लेखांतून स्पष्ट केली आहे. परंतु आयुष्याच्या शेवटी शेवटी त्यांच्या या भूमिकेमध्ये महत्त्वाचा बदल झाला. इंग्रजी राज्यामध्ये या देशात फार मोठे दारिद्र्य आले. लोक अन्नान्नदशेला

* " ग्रामरचना, त्यातील व्यवस्था आणि त्यांची हल्लीची स्थिती " या लोकहितवादींच्या १८८३ साली प्रकाशित झालेल्या परंतु अतिशय दुर्मिळ असलेल्या पुस्तकाच्या आधारे हा लेख लिहिला आहे.

पोहोचले. न्याय अत्यंत महागडा झाला, अशी त्यांची धारणा झाली. यामुळे ते इंग्रजी राज्याचे कठोर टीकाकार बनले. त्यांच्या उत्तर आयुष्यातील हे वैचारिक स्थित्यंतर त्यांच्या या ग्रामरचना या पुस्तकातून प्रतिबिंबित झाले आहे. महाराष्ट्राला लोकहितवादी जे परिचित आहेत ते प्रामुख्याने शतपत्रातील लोकहितवादीच होत. परंतु आयुष्याच्या शेवटी शेवटी त्यांच्या विचारामध्ये झालेला बदल महाराष्ट्राला अद्याप जवळ जवळ अपरिचित आहे. या दृष्टीने हे पुस्तक उपयुक्त ठरेल असे वाटते.

लोकहितवादींनी ग्रामरचनेची वर्णने करताना प्रामुख्याने तीन अंगांवर विशेष भर दिला आहे. ही तीन अंगे म्हणजे खेडयापाडयांतील शेतीची व्यवस्था, न्यायदानाची व्यवस्था आणि खेडयापाडयांतील कारभार-यंत्रणा.

१९ व्या शतकातील ग्रामव्यवस्थेचे वर्णन करताना लोकहितवादींनी सर्वांत जास्त भर कशावर दिला असेल तर या काळातील खेडयापाडयांतील कल्पनातीत दारिद्रय, खेड्यापाड्यांतील शेतकरी गरिबीने गांजून गेला असून त्याला प्रामुख्याने जबर सरकारी शेतसारे व अनियंत्रित सावकारी ही दोन कारणे आहेत असे त्यांनी म्हटले आहे. शेतकऱ्याला शेतातून एक रुपया उत्पन्न मिळत असेल तर त्यातील आठ आणे शेतसारा म्हणून सरकारी तिजोरीत जातो, व शिवाय इतर सरकारी कर त्याला भरावे लागतात. या शिवाय सावकार त्यातून मोठा वाटा व्याजाच्या रुपाने घेऊन जातो. त्यामुळे शेतकऱ्याची शेतमालातून वर्षातील चार महिने कसेबसे गुजराण होते. परंतु उरलेले आठ महिने त्याचे अतोनात हाल होतात. लोकहितवादींनी शेतकऱ्याच्या या परिस्थितीचे वर्णन करताना म्हटले आहे, " हल्ली शेतकरी गरीब, अन्नाला महाग आणि संसार हाकण्यास असमर्थ झालेले असतात. सरकारचे कर, सारे व धारे अतिशय जबर असून ते भरण्याचे कुळंब्यांना मोठे संकट पडते. जीवापाड मेहनत करावी, परंतु त्यांचे फल मात्र सरकार आणि सावकार खाऊन त्यांना आठ महिने मोलमजुरी किंवा नोकरी-चाकरी करून पोट भरावे लागते. हा प्रकार केवळ अयोग्य कारभाराचा आणि प्रजाहिताविषयी असणाऱ्या औदासीन्याचा होय. उत्पन्न होणार एक रुपया आणि सरकार घेणार आठ आणे. या सरकारी धाऱ्याशिवाय शेतकऱ्यास लोकलफंड, स्टॅम्प रजिस्टर ( नोंदणी ) वगैरे संबंधानेही पुष्कळ खर्च सोसावा लागतो. सारांश शेतीच्या कामात त्यास बरकत म्हणून राहिली नाही. शेती सोडून दुसरे धंदे करावे तरी बरकतीचे अनुष्टुभच. " ( ५१ )

## १८७६ च्या दुष्काळाचे वेगळे स्वरूप

जबर शेतसारे व अनियंत्रित सावकारी यामुळे शेतकरी कसा गांजून गेला होता, याचे वर्णन लोकहितवादींनी जागजागी केले आहे. परंतु १८७६-७७ च्या दुष्काळाच्या संदर्भात त्यांनी त्यांच्या गरिबीचे जे वर्णन केले आहे ते हृदयद्रावक आहे.

१८७६-७७ च्या दुष्काळाचे स्वरूप नेहमीच्या दुष्काळापेक्षा वेगळे होते. बाजारात धान्य नव्हते म्हणून हा दुष्काळ पडला होता असे नव्हे, तर बाजारात धान्याच्या राशीच्या राशी होत्या. परंतु हे धान्य घ्यायला लोकांजवळ पैसाच नव्हता. त्यामुळे एका बाजूला धान्याच्या राशीच्या राशी दिसत आहेत व दुसऱ्या बाजूला लोक अन्नान्न म्हणून मरत आहेत असे चमत्कारिक दृश्य या वेळी दिसत होते. हा दुष्काळ त्यामुळे धान्याचा दुष्काळ नव्हे. हा प्रामुख्याने दारिद्र्यातून निर्माण झालेला दुष्काळ होता असे त्यांनी म्हटले आहे. त्याचे स्वरूप वर्णन करताना ते म्हणतात, " गेल्या १८७६-७७ च्या दुष्काळात काय दुर्दशा झाली तो सर्वांस ठाऊकच आहे.................................दुष्काळामध्ये आगगाड्यांमुळे ठिकठिकाणांहून दूरवरचा माल येऊन दुष्काळग्रस्त प्रांतांत धान्याचे ढीग पडत. परंतु त्यातील धान्य खरेदी करून पोट भरण्याचे सामर्थ्य कोणास नव्हते. त्यामुळे धान्यराशी डोळ्यांसमोर असून द्रव्यापत्तीमुळे लक्षावधी लोक अन्न अन्न करून मेले, तेव्हा वरील साली जो काळ पडला-काळ पडला म्हणून बोभाटा झाला तो धान्याधुन्याचा काळ नसून द्रव्याचाच काळ होता हे खचित. त्यास धान्याचा काळ म्हणता येतच नाही. कारण स्टेशना स्टेशनांवरून पल्लोगणती धान्याची पोत्यांवर पोती पडली होती. परंतु त्याचा उपयोग काय? जवळ पैसा असेल तर ते धान्य मिळणार. एरव्ही कसे मिळणार? " ( पान ३४-३५ )

## शेतसारे असह्य का झाले ?

शेतकऱ्यांच्या या अवस्थेला प्रामुख्याने त्या काळातील जबर शेतसारे कारणीभूत होते, असे लोकहितवादींनी

म्हटले आहे या शेतसाऱ्याच्या आकारणीची ऐतिहासिक पार्श्वभूमी त्यांनी दिली आहे. १८३७ साली महाराष्ट्रात शेतसाऱ्याची आकारणी झाली. ही आकारणी शेतकऱ्याची आर्थिक स्थिती लक्षात घेऊन पुष्कळ काळजीपूर्वक केली असे त्यांनी म्हटले आहे. परंतु नंतर १८३७ साली दुसऱ्या वेळी साऱ्याची आकारणी झाली. या वेळी शेतसारे फार वाढले. याची काही उदाहरणे देताना लोकहितवादी म्हणतात, "ही धारेबंदी इतकी मनस्वी वाढली की जो गाव पूर्वीच्या पाहणीत पाचशे रु. ठरला होता, तो पस्तीसशे रुपयांवर चढला आणि शंभर रुपयांचा गाव सातशेवर गेला. अशी उदाहरणे आहेत." (पान ६१) शेतसारे जबरदस्त वाढण्याचे दुसरे कारण सांगताना लोकहितवादी म्हणतात,"हे धारे इतके मनस्वी चढण्याचे दुसरे कारण असे झाले की या कामात जमीनदारांचा म्हणून काही एक विचार घेतला नाही. पाहणीदारांना जसे वाटले तसे त्यांनी आकार दपटून दिले. जमीनदार तर बापडे घरी स्वस्थ बसले होते. त्याच वेळी शेरबाजाराने जमिनीच्या व मालाच्या किमती वाढल्यामुळे पाहणीदारांनाही हे दर व धारे फारसे कठीण वाटले नाहीत. परंतु शेरबाजार तर पुढे सहा महिनेही टिकला नाही व मालाच्या व जमिनीच्या किमती खड्कन उतरल्या. तेव्हा सारे जबरदस्त झाले, असे चोहोकडे अनुभवास आले. लोकहितवादींनी दिलेले दुसरे कारण अतिशय महत्त्वाचे आहे.१८६० ते १८६७ हा काळ महाराष्ट्रामध्ये किंवा हिंदुस्थानमध्ये थोडा समृद्धीचा काळ होता. १८६१–६२ साली अमेरिकेमध्ये यादवी युद्ध सुरू झाले होते. त्यामुळे हिंदुस्थानातील मालाला बाहेर मागणी वाढली होती. याच काळात रेल्वेची कामे महाराष्ट्रात सुरू झाली. या कामामध्ये शेकडो लोकांना मजुरी मिळू लागली होती. पाऊसही या काळात चांगले झाले होते. त्यामुळे पिकेही पुष्कळ चांगली आली होती. या सर्वांचा एकत्रित झालेला परिणाम म्हणजे शेतकऱ्याची स्थिती काही अंशी सुधारली होती. शेतसाऱ्याची आकारणी या काळात झाली. त्यामुळे आकारणी जास्त झाली तरी शेतकऱ्यास त्याचे फारसे काही वाटले नाही. परंतु पुढे १८६७ नंतर महाराष्ट्रात मंदीचा काळ सुरू झाला. अमेरिकेतील यादवी युद्धाचा फायदा थोडासा काळ मिळाला होता. परंतु यादवी युद्ध संपल्यावर मालाची मागणी एकदम कमी झाली. १८६७ साली मोठा दुष्काळ आला आणि शेतकरी एकदम कंगाल झाला. रेल्वेची कामे बंद झाल्याने मजुरीही मिळेनाशी झाली. या मंदीच्या-शेतकऱ्याच्या पडत्या काळात वाढलेल्या शेतसाऱ्याची अमलबजावणी सुरू झाली. त्यामुळे शेतकरी नव्या सारावाढीमुळे मोठ्या अडचणींमध्ये सापडला.

या काळात दुसरीही महत्त्वाची घटना घडली. १८२७ साली सावकारीसंबंधी कायदा सरकारने केला होता. त्यामुळे येथे शेतकऱ्याच्या मालाचा लिलाव करताना काही आवश्यक वस्तूंचा लिलाव करू नये अशी तरतूद कायद्यामध्ये केली होती. हा कायदा १८५९ साली बदलला व पैशाच्या वसुलीसाठी शेतकऱ्याच्या कोणत्याही वस्तूचा लिलाव करण्यास सावकारास परवानगी मिळाली. जमिनीच्या मालकी हक्कासंबंधीदेखील महत्त्वाचे बदल झाले. इंग्रजी राजवटीपूर्वी जमिनीची मालकी खाजगी नव्हती. त्यामुळे जमिनी गहाण टाकणे, विकणे हे व्यवहार कधी होत नव्हते. नव्या इंग्रजी राजवटीमध्ये शेताची खाजगी मालकी प्रत्येकाला मिळून ही शेते तो गहाण टाकू शकू लागला वा त्याची विक्री करू लागला. एका बाजूला शेतकऱ्याला शेतीसंबंधी हा अधिकार मिळाला व दुसऱ्या बाजूला सावकाराला पूर्ण संरक्षण मिळाले. त्यामुळे १८६० नंतर शेतकरी सावकराकडून कर्जे मोकळ्या मनाने घेऊ लागला. सावकारदेखील विनदिक्कतपणे शेतकऱ्याला कर्जे देऊ लागले. १८६० ते १८६६ या काळात शेतकऱ्यांनी सावकाराकडून मुबलक प्रमाणात कर्जे घेतली. परंतु १८६६ नंतर त्यांना कर्जाची फेड करणे कठीण जाऊ लागले. त्यामुळे सावकारांनी शेतकऱ्यांच्या घरादारांचे, शेतांचे लिलाव करून रकमेची वसुली सुरू केली. १८६५ ते १८७५ या काळात महाराष्ट्रामध्ये सुमारे २५ टक्के शेते शेतकऱ्यांकडून सावकारांकडे गेली, याचा परिणाम महाराष्ट्राच्या खेड्यापाड्यांतील जीवनावर किती मोठ्या प्रमाणावर झाला असेल याची कल्पना केलेली बरी. याच काळात व्याजाचे दर अनियंत्रित होते. शेतकरी अशिक्षित होता. शेतकऱ्याची फसवणूक करून सावकारीचे व्यवहार होण्याचाही संभव होता. या काळात वाढलेले शेतसारे व सावकारांची कर्जाची वसुली यामुळे हजारो शेतकऱ्यांचे जीवन विस्कळित झाले. शेतकऱ्यांचे जीवन विस्कटले गेल्यावर शेतकऱ्यांवर अवलंबून असणाऱ्या शेतमजुरांची-इतर बलुतेदारांची अवस्था अनुकंपनीय झाली यामध्ये आश्चर्य काय ?

लोकहितवादींनी शेतकऱ्यांच्या दयनीय अवस्थेबद्दल येथे जी वर्णने केली आहेत ती या काळातील आहेत. ही पार्श्वभूमी लक्षात आली म्हणजे लोकहितवादींच्या तक्रारीचे गांभीर्य लक्षात येण्यास मदत होते.

## न्यायदान यंत्रणा महागडी

लोकहितवादींची दुसरी तक्रार त्या काळातील न्यायदानासंबंधी आहे. या काळात न्याय अतिशय दिरंगाईचा व फार महागडा झाला व त्यामुळे खेड्यापाड्यांतील लोकांना न्याय मिळविण्यापेक्षा अन्याय सहन करून निमूटपणे गप्प बसणे बरे असे वाटू लागले. न्यायदानाच्या क्षेत्रातील या अनिष्ट गोष्टीमुळे ग्रामरचनेतील सारे जीवनच विस्कळित होऊन गेले. याचे वर्णन करताना लोकहितवादी म्हणतात, 'ह्या न्याय मिळविण्याचे कामात खर्चण्याची यंत्रे कशीतरी लागून राहिली असून त्या यंत्राचे काम कसे एकसारखे चाललेले असते. वकील, बॅरिस्टर, अटर्नी सालिसिटर वगैरे यंत्रे पैसा ओढण्यास लागली असून त्यास प्रत्येकी व प्रत्यही शंभर–शंभर, दोन–दोनशे रुपये रोजाप्रमाणे द्यावे लागतात. अशा प्रकारचे न्यायाच्या व्यवहारात गरीबगुरिबांची दाद कशी लागावी हे दिसतच आहे. श्रीमंतांची संपत्ती तर सर्व असल्या वादात हरण होऊन वादाच्या रकमेच्या चौपट–दसपट खर्च होऊन जातो. मग वाद जिंकला तरी न्याय झाला म्हणावा की नाही, झाला म्हणून म्हणावा, तर एक रुपया वसूल होण्याकरिता चार रुपये खर्च यावा म्हणजे ही काय दाद का न्याय म्हणावे काय? सारांश असल्या न्यायदानाने रयतेची दुर्दशा झाली.'' (पान ६४) लोकहितवादी यासंबंधीचे वर्णन करताना आणखी एका ठिकाणी म्हणतात, या भांडणात आणि न्याय मिळविण्यात घरदार विकून कफल्लक व्हावे लागते. हायकोर्टात अपील लागले म्हणजे घरबसल्या बोलावणे येते, परंतु हे समन्स पंचवीस रुपये मागतो. व शंभराचा बक्षीस–रोखा लिहून दे म्हणतो. त्याचप्रमाणे हायकोर्टात साक्षी आणण्याकरिता कोर्टाचा भत्ता, साक्षीदाराचा खुराक, स्टँपचा खर्च, त्याशिवाय कारकून शिपायास चिरीमिरी इत्यादी खर्चाची सदरे भरायला पैसे पाहिजेत. हे इतके पैसे आणू कोठून? ही त्याला आणखी काळजी उत्पन्न होऊन त्याची कंबर आणखी खचून जाते. मग तो बिचारा व्यग्रचित्त होऊन असे म्हणतो की, जळो तो कज्जा आणि दावा. या भानगडीत आणि खर्चांत पडून आपल्याला आणखी खर्चात बुडवून घेऊ नये. असे म्हणून तो परत घरी येऊन स्वस्थ बसतो. त्याला कोर्ट म्हणजे पैशाची उधळपट्टी आणि धुळधाण करणारी अशी कालिका देवीच्या बलिदानाची महादेवीच वाटते. (पान ४९–५०)

## वांशिक अहंकार

न्यायदानाच्या कामात या काळात आणखी एका प्रश्नाने गुंतागुंत निर्माण झाली होती. इंग्रज अधिकाऱ्यांच्यामध्ये वांशिक अहंकाराचा संचार झाला होता. त्यामुळे ते तेथील लोकांना तुच्छ वा हलके मानीत. त्यांना या देशातील परंपरा माहीत नव्हत्या. त्यामुळेही न्यायदानाच्या कामात गोंधळ निर्माण होई. याचे वर्णन करताना लोकहितवादी म्हणतात, "इंग्रजी राज्यात मोठी चूक ही आहे की सरकार इतरदेशीय लोकांचे मत म्हणून काहीच घेत नाही. काळे लोकांवर म्हणून त्यांचा विश्वास नसून त्यास ते हलकट समजते. सरकारच्या या काळ्यागोऱ्याच्या पक्षपाताने गोऱ्या कामदारांकडून अज्ञानाने अन्याय फार होतात. त्यास काळ्या लोकांत मिळूनमिसळून राहण्याचे आवडत नाही. त्यामुळे काळ्या लोकांच्या पूर्वापार रीतिभाती व आचारविचार हे कसे आहेत हे माहीत नसते. आणि तेणेकरून त्याजकडून जे त्याच्या वादाचे व कज्जाचे निकाल होतात ते भलतेच होतात. असे अनेक प्रसंगी सरकारास व रयतेस कळून आले आहे.–'' (पान ४७)

## आयुष्याच्या शेवटी सामाजिकदृष्ट्या सनातनी विचाराचे प्रवक्ते

आयुष्याच्या प्रारंभी राजकीय क्षेत्रात ब्रिटिश राजवटीबद्दल अत्यंत स्वागताची भूमिका घेणारे लोकहितवादी आयुष्याच्या शेवटी शेवटी ब्रिटिश राजवटीचे कठोर टीकाकार बनले. त्याचप्रमाणे सामाजिक क्षेत्रात प्रारंभी सुधारकाची भूमिका घेणारे लोकहितवादी आयुष्याच्या शेवटी शेवटी परंपरावादी, सनातनी भूमिका घेऊ लागले. त्यामुळे सामाजिक प्रश्नावरील भूमिकेवरील प्रश्नावरदेखील शतपत्रातील त्याची भूमिका व ग्रामरचनेतील त्यांची भूमिका यांमध्ये महत्त्वाचा फरक आहे.

ग्रामरचनेतील परंपरागत वतन-पद्धती नष्ट होत चालल्याबद्दल लोकहितवादींना आनंद होण्याऐवजी हळहळ वाटत असल्याचे या पुस्तकावरून दिसून येते.

आपली हळहळ व्यक्त करताना ते म्हणतात, "परंतु हल्लीं वतनदारीकडील लोकांचे लक्ष उडाले आहे. याचे कारण सरकारातून त्यास मिळावा तसा मान मिळत नाही व सरकारास त्याचा अभिमान नाही. सारांश त्यांची इतर लोकांप्रमाणेच दैना व हाय हाय ऐकू येते. सर्व प्रकारे सर्व गोष्टींत वतनदारास सरकारचे असाह्य असल्यामुळे ते जागच्याजागीच ठार होत चालले आहे, व हेच सरकारास कर्तव्य आहेसे दिसते." (पान ४६–४७)

वास्तविक वतनपद्धती व जातिव्यवस्था, अस्पृश्यता हे आपल्या ग्रामरचनेतील प्रमुख दोष होते. महाराष्ट्र खऱ्या अर्थाने आधुनिक व्हायचा असेल तर आमच्या समाज व्यवस्थेतील हे दोन्ही दोष दूर होणे जरूर होते. परंतु लोकहितवादी वतन-पद्धती नष्ट होत चालल्याबद्दल हळहळ व्यक्त करतात यावरून त्यांच्या बदललेल्या भूमिकेबद्दल कल्पना स्पष्ट होते. वतन-पद्धतीप्रमाणे सावकार वर्गाबद्दल त्यांना जिव्हाळा किंवा आपुलकी दिसते. १८६० ते १८८० हा काळ सावकारीच्या दृष्टीने महाराष्ट्राच्या इतिहासातील अत्यंत वाईट काळ होता. सावकारांना या काळात कायद्याने पूर्ण संरक्षण होते व व्याजाचे दर, इतर बंधने या बाबतीत ती पूर्ण अनियंत्रित होती. यामुळे या काळात शेकडो शेतकऱ्यांची शेते सावकारांकडे गेली. जगातल्या इतर देशांशी तुलना करता महाराष्ट्रातील सावकारीचा हा अत्यंत वाईट काळ होता. यामुळे महाराष्ट्रात शेतकऱ्यांची बंडे झालेली आहेत. शेतकऱ्यांना अनियंत्रित सावकारीमधून काहीसे मुक्त करावे म्हणून १८७९ साली Agricultural Relief Act संमत केला. परंतु या कायद्यामुळे सावकार बुडाले अशी तक्रार लोकहितवादी करताना दिसतात. यासंबंधी आपले गाऱ्हाणे मांडताना ते म्हणतात, "१८२७ च्या कायद्यात असे कलम होते की कुणब्याच्या जरुरीचा व निर्वाहाचा जो माल अथवा जे सामान असेल ते देण्याघेण्याचे संबंधात सरकारने किंवा सावकाराने घेऊ नये. परंतु पुढे पुन्हा तो कायदा जो सापडेल तो माल घेऊन लिलांव करून पैसा वसूल करावा असे कलम दाखल केले. आणि आता पुन्हा तो ठराव मोडून पहिल्या कायद्याच्या अर्थाचाच दुसरा कायदा पसंत केला. यामुळे एक वेळ रयत बुडाले आणि एक वेळ सावकार बुडाला. (पान ६०–६१) येथे सावकार बुडत असल्याबद्दल जी हळहळ लोकहितवादींनी व्यक्त केली आहे ती कांहीशी चमत्कारिक वाटते.

न्यायदानाच्या बाबतीतदेखील आधुनिक न्यायपद्धती काढून टाकून तेथे जुन्या परंपरागत न्याय पंचायती आणाव्या असे त्यांनी म्हटले आहे. या संबंधीचे विवेचन करताना ते म्हणतात, "न्याय मनसुबीची पूर्वीची रीति अगदी साधी आणि बिनखर्चाची असे. गांवकरी लोकांचे अनुमताने पाटील कुलकर्णी वगैरे वतनदार नेमीत व ते सभ्य लोकांना पंच नेमून त्याजकडून पंचायती करवीत. त्याप्रमाणे आता केले तर होणार नाही असे नाही." (पान ४८)

लोकहितवादींची ही सूचना एका दृष्टीने महत्त्वाची होती. परंतु १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात आमच्या जातिबद्ध व्यवस्थेमध्ये जुन्या न्याय पंचायतीचे आम्ही पुनरुज्जीवन केले असते तर अस्पृश्यांना न्याय मिळाला असता का? मानवी समतेचा वा कायद्याच्या राज्याचा विचार डोळ्यासमोर ठेवून न्याय दिला गेला असता का? आता शंभर वर्षांनंतरदेखील परिस्थितीमध्ये महत्त्वाचा बदल झाला आहे का? त्या काळात जर ही परिस्थिती अस्तित्वात आली असती तर 'ग्रामरचना' अधिक निकोप झाली असती का? असे अनेक प्रश्न या संदर्भात मनासमोर उभे राहतात.

लोकहितवादींच्या काळातील ग्रामीण जीवनातील परिस्थिती आणि आजची स्थिती यांच्या संदर्भात लोकव्यक्तिमत्त्वाचा विचार करताना आणखी एक गोष्ट चटकन लक्षात येते, ती अशी की, आयुष्याच्या आरंभी त्यांनी प्राचीन वेदविद्येबद्दल घेतलेली भूमिका व आयुष्याच्या शेवटी शेवटी या वेदविद्येबद्दल स्वीकारलेली भूमिका यांमध्ये महत्त्वाचा फरक पडलेला आहे.

### वेदविद्येच्या गौरवाची भूमिका

जीवनाच्या प्रारंभी त्यांनी इंग्रजी ज्ञानाचे मुक्त मनाने स्वागत केले आहे. व जुन्या प्राचीन वेदविद्येबद्दल फार कठोर भूमिका स्वीकारली आहे. जुन्या विद्या नव्या औद्योगिक क्रांतीच्या संदर्भात निरुपयोगी आहेत; असा त्यांचा एक प्रमुख युक्तिवाद होता. जुन्या विद्येवर अनेक बाजूंनी त्यांनी प्रहार केलेले आहेत. संस्कृत ज्ञान निरुपयोगी आहे. इतकेच नव्हे तर आधुनिक ज्ञानाच्या दृष्टीने संस्कृतमधील ज्ञानाची तुलना करता ते कःपदार्थ आहे; असेही त्यांनी म्हटले आहे. संस्कृत विद्येवरील टीका करताना ते म्हणतात," याप्रमाणे कोणतेही भागात जरी पाहिले तरी संस्कृत विद्या निरुपयोगी व नाना प्रकारचे

कुतर्क उत्पन्न करणारी व संसारावरील चित्त उडवून आळशी करणारी व निरुपयोगी कर्मे करणारी आहे. सांप्रत काळी जे ज्ञान पाहिजे ते त्यात मुळीच नाही. सांप्रत काळचे देश, तेथील राज्ये व फौजा व व्यापार इत्यादिकांची माहिती, यंत्राची उत्पत्ती, कायदेकानू कसे असावे, गैरचाली कोणत्या आहेत. टाकाव्या कोणत्या, ठेवाव्या कोणत्या हे त्यास माहीत नसते. दोन चार हजार वर्षां-पाठीमागे पिचलेले वेड वगैरे समजुती व वाकडे तर्क हेच आता काढून त्यांची वाटाघाट करीत आयुष्य घालवितात. जोपर्यंत बाहेरच्या देशातील वर्तमान लोकांस ठाऊक नव्हते तोपर्यंत याच ज्ञानाचा थोरपणा होता व हे ज्ञान ज्यापाशी होते त्यास थोर मानून त्याच्या पायाचे तीर्थ घ्यावे येथपर्यंत मजल आली. पुढे ते म्हणतात, " परंतु जे इंग्रजी भाषेत ज्ञान व विद्या आहे. त्यातला या भाषेत एक गुंज देखील अंश नाही. आणि शब्दज्ञानाचा उपयोग कोणता की, पंडित सभेत जमून बडबड करतात. त्या-पासून लोकांस काही उपयोग नाही. धर्म नाही, अर्थ नाही. हा वितंडवाद, परंतु पंडितास हीच मोठी विद्या वाटते. व तिजवर ते मिरवितात. परंतु त्यास असे वाटत नाही की, आमचे ज्ञान निरूपयुक्त व पोकळ आहे व याजवर लोकास आता फसवू नये. "

परंतु आयुष्याच्या शेवटी शेवटी त्यांच्या वेदविद्ये-संबंधी वा संस्कृत मधील ज्ञानासंबंधीच्या भूमिकेमध्ये मूलभूत बदल झाला. " स्वाध्याय " या १८८० साली लिहिलेल्या पुस्तकात आपल्याला याचा प्रत्यय येतो. संस्कृत विद्येचा आपल्या राष्ट्राला विसर पडला म्हणूनच या समाजाचा फार ऱ्हास झाला अशी भूमिका त्यांनी या काळात घेतली आहे. या देशाला पुन्हा ऊर्जितावस्था पाहिजे असल्यास या समाजाने प्राचीन संस्कृत विद्येचे पुनरुज्जीवन केले पाहिजे. त्याशिवाय तरणोपाय नाही असेही विचार त्यांनी मांडले आहेत. संस्कृतविद्या ही टाकाऊ निरुपयोगी आहे; असे जीवनाच्या प्रारंभी म्हणणारे लोकहितवादी आयुष्याच्या शेवटी शेवटी या विद्येवाचून भारताचा उत्कर्ष अशक्य आहे म्हणू लागले. आपल्या या विचाराचा प्रपंच करताना ते म्हण-तात, " ज्या ज्या काळी हे ग्रंथ झाले त्या त्या काळी त्यांची अतिशय श्रेष्ठता होती. प्रथमतः ते ग्रंथ ज्या भाषेत लिहिले ती संस्कृत भाषाच अतिशय सुधारलेली व कमावलेली आहे. संस्कृत भाषेची व्यापकता सर्वश्रुतच आहे. हा भाषा चमत्कार इतर कोणत्याही भाषेत सापडणार नाही. एकेका धातूपासून दोन दोन हजार रूपे होतात. असे आहे तरी त्या सर्वांचे नियम पाणिनीने चार हजार सूत्रांत बांधले व सर्वांस भाषाज्ञानाचे सौलभ्य करून दिले. ह्याचे मोठे आश्चर्य वाटते. ह्या प्रमाणे आपल्या आर्य पूर्वजांची ही परमवंद्य भाषा तिची पुढे उतरत्या काळात बहुत दुर्दशा होत चालली. संस्कृत भाषाज्ञानाचा जसजसा लोप होत चालला तसतसे आर्य ग्रंथावलोकन फार दुर्लभ होत चालले आणि या अवलोकनाने आपल्या आर्य पूर्वजांच्या विद्या, ज्ञान, रीतिभाती व त्याची सत्कर्ती यांच्याविषयी सर्वत्र विसर पडला व तेणेकरून बहुत अहित झाले. यामुळे आर्य लोकांच्या मूळ स्थितिरीतीला ऱ्हास काळ येत चालला. परंतु ह्या आर्यांच्या प्राचीन रीतिभातींचे ज्यांनी अनुकरण केले ते उच्चावस्थेस पावू लागले. याकरिता वर लिहिल्याप्रमाणे प्राचीन आर्य विद्यांचे ज्ञान प्राप्त करून त्याचा फैलाव झाला पाहिजे. ज्यास फुरसत असेल त्यांनी संस्कृत शिकून आर्य विद्यांमध्ये निष्णात झाले पाहिजे. व ज्यास फुरसत नसून संस्कृत ज्ञानही नाही त्याजकरिता आपापल्या देशभाषेत ते ते प्राचीन आर्यांचे ग्रंथ उतरून पूर्वजांच्या ग्रंथ ज्ञानाची सुलभता केली पाहिजे. येणे करूनच आपणास उन्नती येऊन आपण आपले कर्तव्य केलेसे होईल. वडिलांचा अभिमान सर्वस्वी सोडला तर ऱ्हास काळ अधिक वाढेल व कोणत्या परिणामास हे राष्ट्र जाईल हे काही सांगवत नाही. आर्य विद्यांच्या प्रभावाने पूर्वी आर्य लोकांस मोठी उन्नती प्राप्त झाली होती. परंतु त्या आर्य विद्यांचे विस्मरण झाल्यामुळे हल्ली ही नीचावस्था प्राप्त झाली आहे. " ( स्वाध्याय–प्रस्तावना पा. ३–४. ) संस्कृत विद्या कवडी मोलाची आहे असे म्हणणारे लोकहितवादी पुढे पुढे या आर्य विद्येच्या पुनरुज्जीवनाशिवाय या देशाचा उद्धार होणार नाही या निष्कर्षाला आले याचे कारण १८७०–७२ नंतर त्यांच्यावर पडलेला स्वामी दयानंद सरस्वतींचा प्रभाव असावा. आर्य समाजाच्या विचारांचा त्यांच्यावर पडलेला खोल प्रभाव 'स्वाध्याय' च्या प्रस्तावनेतून दिसतो. याच पुस्तकात ते त्यांनी वेद हे ऋषीकृत आहेत तरी ते ईश्वरोक्तिवत आहेत असे म्हटले आहे. ( पा. नं. ३२० )

# मुकुंदराज-शिष्य जैत्रपाळाचा शोध

रामचंद्र चिंतामण ढेरे

### जैत्रपाळाची समस्या

मुकुंदराजांच्या ' विवेकसिंधू 'च्या रचनेला निमित्त झालेला जैत्रपाळ कोण, याचा समाधानकारक निर्णय अजून झालेला नाही. पारंपरिक समजुतीनुसार जैत्रपाळ हा राजा होता. प्रत्यक्ष मुकुंदराजांनी ' विवेकसिंधू ' त त्याचा निर्देश पुढीलप्रमाणे केला आहे —

नृसिंहाचा वल्लाळु । तेयाचा कुमरु जैत्रपाळु ।
तेणें करविला हा रोळु । ग्रंथरचनेचा ॥ वि.सि. ७.१५५

या निर्देशात जैत्रपाळ हा राजा होता, या समजुतीला आधार सापडत नाही. परंतु ' विवेकसिंधू 'त अन्यत्र विवेचनाच्या ओघात शिष्याचे संबोधन म्हणून दोन वेळां ' राणे हो ' म्हणजे ' हे राजा ' असे शब्द वापरलेले आढळतात.[1] त्यावरून ' विवेकसिंधू 'च्या रचनेला निमित्त झालेला मुकुंदराजांचा शिष्य जैत्रपाळ हा राजा होता, ही पारंपरिक समजूत खरी आहे, असे मानण्यास अडचण उरत नाही.

हा जैत्रपाळ राजा कोण ? तो कोठे राज्य करीत होता ? त्याचा राज्यकाल कोणता ? – इत्यादि प्रश्नांना निश्चित उत्तरे देणे उपलब्ध साधनांवरून शक्य नाही. कोणी म्हणतात, हा देवगिरीच्या यादव घराण्यातील जैतुगी होय,[2] तर कोणाच्या मते होयसळ यादव घराण्यातील द्वितीय नरसिंह म्हणजेच जैत्रपाळ होय.[3] जेम्स बर्जेसने या संदर्भात असे म्हटले आहे की, जैत्रपाळ हा कलचूरींचा मांडलिक असून, तो आंबे जोगाई येथे राज्य करीत होता.[4] या विधानास जेम्स बर्जेसने आधार मात्र कसलाच दिलेला नाही. देवगिरी यादव घराण्यातील जैतुगी अथवा जैत्रपाळ हा 'विवेकसिंधू 'तील नृसिंह-वल्लाळ-जैत्रपाळ या वंशावळीशी जुळणारा नसल्यामुळे त्याचा प्रस्तुत संदर्भात विचार करण्याचे कारण नाही. होयसळ यादव घराण्यात नृसिंह–वल्लाळ–नृसिंह अशी वंशपरंपरा आढळते. यांपैकी पहिली दोन नावे ' विवेकसिंधू 'तील नावांशी जुळती असल्यामुळे द्वितीय नृसिंह म्हणजेच जैत्रपाळ होय, असे मानण्याचा मोह काही संशोधकांना झाला आहे. परंतु हा मोह निराधार आहे. मग हा जैत्रपाळ आहे तरी कोण ?

### झाडीमंडळाचा राजा

काही उत्तरकालीन महानुभावीय ग्रंथांत मुकुंदराज आणि जैत्रपाळ यांच्याविषयीचे जे उल्लेख आलेले आहेत, त्यांत जैत्रपाळ हा झाडीमंडळाचा राजा असल्याचा निर्देश आहे. मेघचंद्र-कृत ' यक्षदेव वृद्धान्वया 'तील पुढील निर्देश पाहा—

राजोरा रोहणे झाडीमंडळेसी । रावो पुण्यराशी जैत्रपाळ ॥
ज्येष्ठ तातबंधु नृपति मुकुंदु योगी ज्ञानसिंधु ब्रह्मचारी ॥
नैश्वर संसारु ज्ञानें जाणुनियां । मग तो राघवा अनुसरे ॥
नृसिंह बल्लाळ पुत्र जैत्रपाळ । अनुज अमळ महादेवो ॥
कुबीराहीपसी संपत्ती विशेष । पोटीं नसे वंश जैतपाळा ॥
धाकला अनुज महेश भूभुजु । तयाचा आत्मजु बंधुपुत्र ॥
आपण मुकुंदापदीं शरण जाला । संगत्याग केला जैतपाळें ।
मुकुंदोपदेशें बाणली विरक्ती । जाली चित्तवृत्ति समाधिस्थ ॥
जैतपाळ रावो मुकुंदा विनवी । वेदान्त कथोनी तोखवीला ॥
विवेकसिंधु पैं नाम संबंधीला । तोचि लोकीं आला आजवेरी ॥[5]

---

१. ' विवेकसिंधू ' : ७. ४३; ७. १३३ ( प्रा. कृ. पां. कुलकर्णीसंपादित आवृत्ती ).

२. ' प्राकृत व मराठी भाषेचा इतिहास ' : ना. भ. पावगी, पृ. १५९; ' हेमाद्रि उर्फ हेमाडपंत ' : के. आ. पाध्ये, पृ. २००.

३. ' विवेकसिंधू ' : सं. प्रा. कृ. पां. कुलकर्णी. प्रस्तावना, पृ. ७०–७१.

४. ' Archaeological Survey of India, Vol. III, pp. 49.

५. भा. इ. सं. मंडळ त्रैमासिक १२.२, पृ. ५३.

अनुक्रमणिका

या उताऱ्यात जैत्रपाळाच्या वंशाची जी माहिती आलेली आहे, तीवरून पुढीलप्रमाणे वंशालेख मांडता येईल—




या वंशालेखावरून हे स्पष्ट होईल की, ' यक्षदेववृद्धान्वया ' नुसार मुकुंदराज हे राजघराण्यातील असून, ' विवेकसिंधू 'च्या निर्मितीला निमित्त झालेल्या जैत्रपाळ राजाचे ते चुलते होते. जैत्रपाळ हा निपुत्रिक असून वृत्तीने विरक्त होता. त्याने आपला राज्यभार पुतण्याला दत्तक घेऊन त्याच्यावर सोपविला व आपण स्वतः मुकुंदराजांना शरण गेला. जैत्रपाळाला बोध करण्यासाठीच मुकुंदराजांनी 'विवेकसिंधू ' ची रचना केली. या माहितीबरोबरच वरील उताऱ्यात जैत्रपाळ हा झाडीभंडळाचा राजा होता, असा जो उल्लेख आलेला आहे, तो महत्त्वाचा आहे. त्यामुळे जैत्रपाळाचा शोध करण्याची एक वेगळीच दिशा पुढे आली आहे.

## झाडीमंडळाची निश्चिती

' यक्षदेववृद्धान्वया ' तील वरील उतारा प्रथम सादर करणाऱ्या डॉ. य. खु. देशपांड्यांच्या मते राजोरा रोहणे हे स्थान अमरावती जिल्ह्यांतील मोर्शी तालुक्यात आहे. या मताच्या स्पष्टीकरणासाठी त्यांनी कोणतीही साधार चर्चा केलेली नाहीं. " वरील उताऱ्यावरून राजूर-रोहिणखेड—जे मोर्शी तालुक्यात आहे.—येथील राजघराण्यातील मुकुंदराज होते, असा कवीचा आशय दिसतो. "[६] इतकेंच डॉ. देशपांडे यांनी प्रस्तुत संदर्भात लिहिले आहे.

लोकनायक मा. श्री. अणे यांनी गोगटे-संपादित 'विवेकसिन्धू'ला लिहिलेल्या पुरस्कारांत झाडीभंडळाची स्थाननिश्चिती करताना लिहिले आहे कीं, " वर्धा-पैनगंगेच्या संगमानंतर प्रणीता या नावाने प्रसिद्ध असणाऱ्या नदीच्या दक्षिण तीरावर थोड्याच मैलांच्या अंतरावर राजूर-माणिकगड हे स्टेशन आहे........ ज्या राजोरा गावाचा उल्लेख वरील अभंगात आहे, ते हे प्रसिद्ध राजूर-माणिकगड होय. तेथून वर्धा नदीच्या खोऱ्याच्या उत्तरेकडे गेल्यास चंद्रपूर जिल्हा संपल्यावर वर्धा जिल्ह्यातील आर्वी व हिंगणघाट तालुक्यांचा भाग येतो. तेथेच रोहणे नावाचे एक खेडे वर्धेच्या तीरावर आहे. राजूरपासून रोहण्यापर्यंत म्हणजे हल्लीच्या आर्वी तालुक्यापर्यंत दक्षिणोत्तर जयतपालाच्या राज्याची मर्यादा दाखविली आहे. नागपूर, चंद्रपूर, भंडारा व बालाघाट म्हणजे हल्लीच्या नागपूरपासून तो गोंदिया-डोंगरगड स्टेशनपर्यंतच्या मुलखास झाडी असे नाव आहे व अजूनही जुने लोक व अशिक्षित लोक त्या प्रदेशाला झाडी असे म्हणतात. जयतपालाचे राज्य पूर्वेस वैनगंगेच्या खोऱ्यात गोंदिया वगैरे भागापर्यंत पसरले होते. अंभोरा हे गाव भंडारा जिल्ह्यात म्हणजे या झाडी प्रदेशांत आहे. "[७]

लो. अणे यांना, अंभोरे हे झाडी भंडळातच आहे, असे दाखवण्याचा मोह झाल्यामुळे त्यांनी " राजोरा रोहणे झाडीभंडळेसी " यातील राजोरा-रोहणे या जोड ग्रामनामांचे स्पष्टीकरण सोयीस्कर रीत्या राजोऱ्यापासून रोहण्यापर्यंत असे करून, परस्परांपासून किती तरी दूर असलेल्या दोन गावांचा येथे सीमादर्शक म्हणून एकत्र उल्लेख आहे, अशी कल्पना केली आहे. त्यांचा हा तर्क काहीसा अप्रतिष्ठित वाटतो. ' यक्षदेववृद्धान्वया 'तील उताऱ्यात झाडीमंडळ हे जैत्रपाळाच्या राज्यप्रदेशाचे नाव आणि ' राजोरा रोहणे ' हे राजधानीचे नाव म्हणून निर्देशिले आहे, हे सरळ दिसते. राजोऱ्यापासून रोहण्यापर्यंत जैत्रपाळाचे राज्य होते, हे स्पष्टीकरण फारच दूरान्वित आणि पूर्वग्रहाच्या पुष्टीसाठी दिल्यासारखे दिसते.

झाडीमंडळाची स्थाननिश्चिती करण्यासाठी त्याचे प्राचीन वाङ्मयातील व कोरीव लेखांतील उल्लेख तपासायला हवेत. या प्रदेशाचे यादवकालीन उल्लेख पाहता झाडी मंडळ हा तत्कालीन महाराष्ट्रातील एक महत्त्वपूर्ण प्रदेश होता आणि त्यावर यादवांच्या कोणा मांडलिकाचे राज्य होते, असे दिसते.

---

६. भा. इ. सं. मंडळ त्रैमासिक १२·२, पृ. ५३.

७. ' विवेकसिंधू ' : संपा. गो. रा. गोगटे. पुरस्कार, पृ. २७.

(१) शके ११९३ च्या ठाणे (ओवळे) ताम्रपटात हेमाद्रीचे विशेषण 'निर्जितझाडीमंडल' असे आले आहे.[८] त्यावरून झाडीमंडळ यादवांच्या प्रभुत्वाखाली आणण्यात हेमाद्रीचा वाटा असावा, असे दिसते.

(२) नरेंद्राच्या 'रुक्मिणीस्वयंवरा'त 'झाडमंडळीचे क्षेत्री सवळ' असा येथील क्षत्रियांच्या शौर्याचा निर्देश आहे.[९] संतोषमुनी कृष्णदासाच्या 'रुक्मिणीस्वयंवरा'तही 'झाडीमंडळीचा सवळ वाहानुरावो। तेणें वैरियांचा फेडिला ठावो।' असा नरेंद्राच्या उल्लेखाप्रमाणेच उल्लेख आहे.[१०] संतोषमुनीने भीमकाकडून कृष्णाला आंदण मिळालेला प्रदेश म्हणून झाडीमंडळाचा आणखी एकदा उल्लेख केला आहे. म्हणजे ते भीमकाच्या कौंडिण्यपुराच्या निकट असले पाहिजे.

(३) 'लीळाचरित्रा'च्या एकांकात, एलिचपूरचा राजा-राम दरणा आणि चक्रधरस्वामी यांची भेट झाडीमंडळात झाली, अशी माहिती आलेली आहे.[११] 'लीळाचरित्रा'च्या कोणत्या तरी वेगळ्या पाठाच्या आधारे सारस्वतकार भावे यांनी या भेटीचा तपशील पुरविताना लिहिले आहे की, "त्याने (राम दरण्याने) महादेवरावाच्या आग्रहाने झाडीमंडळाच्या राजावर स्वारी केली होती. परंतु झाडी-मंडळाच्या राजाने जाधवांकडे शिष्टाई करून ती स्वारी परतविली व मग रामदेव दरणा हा आपल्या नगराकडे गेला. परत जाताना त्याची व श्रीचक्रधराची गाठ पडून त्याने श्रीचक्रधरास प्रार्थना करून आपल्या नगरास नेले." श्रीचक्रधरस्वामींचे भ्रमण नांदेडकडून झाडीमंडळाकडे झालेले होते आणि तेथून राम दरण्यावरोबर एलिच-पूरला गेले.[१२] या त्यांच्या भ्रमणदिशेवरून असा कयास करता येतो की, नांदेड ते एलिचपूर यांच्यामध्ये कोठे-तरी झाडीमंडळ असावे.

(४) महानुभावांच्या आचारभाष्यात आचार-पाठाच्या पहिल्या सूत्राचे स्पष्टीकरण करीत असताना महाराष्ट्राच्या खंडमंडळांचा तपशील आलेला आहे. त्यात "उभयगंगातीर तेहि एक खंडमंडळ। आन तयापासौनि मेघंकरघाट ते एक मंडळ।" असा गोदावरीतीरप्रदेशाच्या उत्तरेकडील मंडळाचा उल्लेख आहे.[१३] वरील छेदकातील अनुमानाच्या पार्श्वभूमीवर झाडीमंडळ आणि मेघंकरघाट मंडळ एकरूप असावीत असे वाटते. मेघंकर म्हणजे मेहकर. हे गाव बुलढाणा जिल्ह्यातील मेहकर तालुक्याचे ठाणे आहे.

(५) कृष्णमुनी डिंभाच्या 'ऋद्धिपूरमाहात्म्या'त महाराष्ट्राच्या सीमांचा तपशील पुढीलप्रमाणे आलेला आहे—

विन्ध्याद्रीपासून दक्षिण दिशेसी।
कृष्णानदीपासून उत्तरेसी।
झाडीमंडळापासून पश्चिमेसी।
कोकणपर्यंत ॥ १४ ॥

या सीमानिर्देशात पश्चिमेकडील कोकणाच्या सापेक्षतेने महाराष्ट्राचा पूर्वेकडील भाग म्हणून झाडीमंडळाचा उल्लेख आहे. म्हणजे स्थूलपणाने बुलढाण्यापासून माहूरपर्यंतचा टापू झाडीमंडळात समाविष्ट असावा, असे दिसते.

(६) वरील सर्व उल्लेखांतून झाडीमंडळाच्या स्थान-निश्चितीचे जे अनुमान निष्पन्न होते, त्याला बळकटी आणणारा निःसंदिग्ध आधार महानुभावांच्या 'इतिहास' प्रकरणात आहे. "आनेराज व्यासु झाडीमंडळातु श्रीपुरासि गेले :" असे विधान 'इतिहास' प्रकरणात आहे.[१५] हे श्रीपुर म्हणजे अकोला जिल्ह्यातील शिरपूर होय. येथे अंतरिक्ष पार्श्वनाथाचे मंदिर आहे. "कवीस्वरवासीं म्हणितले : हो कां जाल तरि पारिसनाथाचेया श्रीपुरा-वरूनि (सिरपुरावरौनि) जा : तेथ आमुचे गुरुभाऊ आनोवा असति :"[१६] या स्मृतिस्थळातील उल्लेखा-

८. 'हेमाद्रि ऊर्फ हेमाडपंत': के. आ. पाध्ये. परिशिष्टे, पृ. २६.

९. नरेंद्र–'रुक्मिणीस्वयंवर', ओ. २४५.

१०. संतोषमुनि कृष्णदास– 'रुक्मिणीस्वयंवर', ५·५४.

११, 'लीळाचरित्र', एकांक, लीला क्र. ५४.

१२. 'महाराष्ट्र-सारस्वत' (पाचवी आवृत्ती), पृ. ४८–४९.

१३. चक्रधरसिद्धान्तसूत्रे : संपा. भवाळकर-नेने उपोद्घात, पृ.२.

१४. महानुभावीय मराठी वाङ्मय : डॉ. य. खु. देशपांडे, पृ. ८०

१५. मराठी संशोधन पत्रिका, ११·१ 'इतिहास प्रकर्ण' पृ. १५).

१६. 'स्मृतिस्थळ' वृद्धाचार विभाग, लिळा क्र. १६ पृ. ८५.

वरून श्रीपुर म्हणजे अंतरिक्ष पार्श्वनाथाचे शिरपूर होय, यात शंका उरत नाही. बुलढाणा जिल्ह्याच्या सीमेपासून जवळच असलेले हे शिरपूर झाडीमंडळात मोडत होते. यावरून झाडीमंडळाच्या स्थाननिश्चितीबद्दल कसलीच शंका उरत नाही.

## राजूर रोहिणखेडची स्थाननिश्चिती

"राजोरा रोहणे झाडिमंडळेसी," यातील झाडीमंडळ सापडले. आता 'राजोरा रोहणे' हे गाव त्या अनुषंगाने निश्चित करावयाचे आहे. जैत्रपाळाच्या राजधानीच्या स्थानाचे निर्देश महानुभावीय वाङ्मयात आणखी दोनदा आलेले आहेत. 'वेदान्तमार्ग–सिद्धान्त-मार्ग–परंपराकथन' या अप्रकाशित गद्य-ग्रंथात 'राजुर रोहिणी खेडीचा राजा जैतपाळ' असा खुलासा आहे[१७] तर अवचितसुत काशीच्या 'यक्षदेवआम्नायमंजरी'त जो राजुरे रोहणखेडवासी।' असे जैत्रपाळाचे वर्णन आहे.[१८] हे निर्देश पाहता 'राजोरा रोहणे' याचा अर्थ 'राजोऱ्यापासून रोहण्यापर्यंत' असा जो लो. अणे करतात, तसा नव्हे, हे उघड होईल. परस्पर-सान्निध्या-मुळे दोन जोडनावांचा उल्लेख करण्याची जी प्रथा आहे, त्या प्रथेनुसार राजूर-रोहिणखेड हे नाव वापरले गेले आहे. ही दोन्ही गावे तीन मैलांच्या अंतरात बुलढाणा जिल्ह्यातील राजूरघाटाच्या पायथ्याशी आहेत.

यादवकालातील एका मांडलिक राजाची राजधानी ठरण्यासाठी आवश्यक ते प्राचीनतेचे पुरावे येथे आढळ-तात. इस्लामी अमदानीत ऐतिहासिक घटनांनी गाजलेले रोहिणखेड त्याहूनही प्राचीन इतिहासाची चिन्हे आजही मिरवीत आहे. या गावाजवळून पुढे धामणगाव–वढे या गावाकडे जाणारा मोटार-रस्ता तयार करताना जे टेकाड फोडावे लागले, त्या टेकाडात अनेक प्राचीन अवशेष आढळले आहेत. येथे जागोजाग इतस्ततः पडलेल्या सुंदर प्राचीन मूर्तींपैकी काही मूर्ती अलीकडेच नागपूरच्या एका 'महत्त्वाकांक्षी' श्रीमंताने लांबविल्याची हकीकत मला एका स्थानिक गृहस्थांनी उद्वेगाने सांगितली. राजूर येथे गतवर्षी गणेश, शेषशायी, शिव-पार्वती इत्यादी प्राचीन मूर्तिशिल्पे उपलब्ध झाल्याचे वृत्त त्या वेळी मोताळा ब्लॉकमध्ये सोशल एज्युकेशन ऑर्गनायझर म्हणून काम करणाऱ्या गृहस्थाकडून* समजले. राजूरच्या परिसरात, प्राचीन शिलालेख उपलब्ध होण्याचीही शक्यता आहे. एकंदरीत राजूर-रोहिणखेडची प्राथमिक पाहणी करणाऱ्या कोणाही संशोधकाच्या सहज ध्यानी येईल की, हे स्थान प्राचीन इतिहासात एखादे महत्त्व-पूर्ण केंद्र असावे. बाराव्या शतकातील प्रख्यात ज्योतिर्ग-णिती श्रीपतिभट्ट याच रोहिणखेडचा होय.[१९]

आतापर्यंतच्या सर्व विवेचनावरून महानुभावीय वाङ्मयात उल्लेखिलेले झाडीमंडळ–जेथे जैत्रपाळाचे राज्य होते–आजच्या बुलढाणा व अकोला या जिल्ह्यांना व्यापणारे असून, बुलढाणा जिल्ह्यात राजूर घाटाजवळ असलेले राजूर-रोहिणखेड हे स्थान जैत्रपाळाच्या राज-धानीचे ठाणे होय, असे निष्पन्न होते.

## जगळ दरणा = जैत्रपाळ ?

मुकुंदराजांचा शिष्य असलेला जैत्रपाळ राजा हा झाडीमंडळातील राजूर-रोहिणखेडचा राजा होता, हे उत्तरकालीन (सोळाव्या-सतराव्या शतकातील) महानुभावीय वाङ्मयातील उल्लेखांच्या आधारे निष्पन्न होते. परंतु आद्य महानुभावीय वाङ्मयात मात्र राजूर-रोहिणखेडच्या तत्कालीन राजाचे नाव 'जगळ दरणा' असे येते. 'गोविंदप्रभुचरित्र' आणि 'स्मृतिसमुच्चय' या दोन ग्रंथांत गोविन्दप्रभूंविषयी भक्तिभाव बाळग-णाऱ्या जगळ दरण्याविषयीचे उल्लेख आलेले आहेत आणि तेथे तो राजूर-रोहिणखेडचा राजा (बैसणाईत-संस्थानिक) होता, असे स्पष्ट म्हटले आहे. "जगळ दरणा तो राजौर रोहिणखेडचा स्वतंत्रु बैसणाइतु :"[२०] "जगळदरणा तो स्वतंत्रु माना ठाकुरिया : तो राजूर-रोहिणखेडिचा बैसणाइत : तेथे स्वतंत्रु राज्य करी;"[२१] असे मूळचे उल्लेख आहेत. जगळ दरण्याने गोविन्द-प्रभूंसाठी पुरोहिताहाती 'राज्यस्थितीची राहाटी' (राज-वैभवाच्या वस्तु) पाठविली. या वस्तूंत पालखी, छत्र,

१७. 'ज्ञानसिंह' मासिक, १९७, पृ. ११४.

१८. तत्रैव, १९७, पृ. ११५.

* श्री. एस्. आर्. कुलकर्णी.

१९. 'ज्योतिषरत्नमाला'–संपा. डॉ. मु. ग. पानसे, प्रस्तावना, पृ. ३.

२०. 'स्मृतिस्थळ', परिशिष्ट क्र. २, पृ. १११.

२१. 'ऋद्धिपूरवर्णन' : संपा. डॉ. य. खु. देशपांडे, परिशिष्ट ब, पृ. १३५.





सुवर्णदंड, चवरी, भांडी, सुगंधी द्रव्ये, उंची वस्त्रे आणि दोन दुभत्या गाई पाठविल्या होत्या. त्याची गोविन्द-प्रभूंविषयीची भक्ती अशी होती की, त्यांच्याकडून रोज धावणेकार ( घोड्यावरून धावणारा दूत ) प्रसाद घेऊन राजाकडे जाई आणि प्रसाद आल्यानंतरच राजा जेवण करी. परंतु कोणा महादेव पाठकाने राजाला सांगितले की, " राजे हो : तुम्ही पाठविता ते गोसावीयांचेया उपयोगा जात नाही : ते नागदेवभटांचेया उपयोगा जाते. " महादेव पाठकाने राजाला ही वस्तुस्थिती निवेदन केल्यापासून राजाने हात आखडता घेतला.

ही घटना चक्रधरस्वामींच्या निर्याणानंतरची दिसते. उत्तरकालीन महानुभाव ग्रंथांतील उल्लेखांत येणारा जैत्रपाळ आणि हा जगळ दरणा राजूर-रोहिणखेडचा एकाच काळातील राजा म्हणून ( उल्लेख करणारांच्या दृष्टीतून ) अभिप्रेत असल्यामुळे जगळ दरणा म्हणजेच जैत्रपाळ होय, असे मानावे लागते.

'जगळ दरणा' या नावातील 'दरणा' हे उपनाम दिसते. एलिचपूरचा राम दरणा आणि त्याचा मुलगा नरसिंग दरणा, अंतूर ( जि. अमरावती ) येथील 'रण-राक्षस' कांई दरणा, रामदेवराव यादवाचा सासरा (कामाइसेचा पिता) महा दरणा आणि हा जगळ दरणा हे सर्व दरणा घराण्यातील 'स्वतंत्र वैसणाइत' यादवांच्या साम्राज्यकक्षेतच नांदत होते, असे दिसते.

### जगळ दरणा आणि यादवांचा अधिकारी जगळदेव

'लीळाचरित्रा'च्या वाइंदेशकर पाठात सिंघणाने गुजराथवर पाठविलेल्या सैन्याचे अधिकारी म्हणून वींझदेव, मायीदेव आणि जगळदेव अशी तीन नावे आली आहेत.[२२] 'लीळाचरित्रा'च्या एकांकात आंबे जोगाई (खोलनायकाचे आंबे) येथे घडलेल्या एका घटनेच्या संदर्भात "जगळदेवो वींझदेवो अधिकार्ये :" असा निर्देश पुनः आलेला आहे.[२३] सिंघणाच्या काळात यादवांचा सेनाधिकारी असलेला हा जगळदेव आणि पुढे झाडी-मंडळात 'स्वतंत्र वैसणाइत' म्हणून नांदणारा जगळ दरणा एकच तर नव्हे ना, अशी शंका येते. यादवांच्या राज्यात अधिकारपदावर असणारा जगळदेव पुढे साम्राज्य-विस्तारात वाटेकरी बनून यादवांच्या छत्राखालीच स्वतंत्रपणे राज्य करू लागला असणे संभवनीय आहे.

### अद्दंकीचे महाराष्ट्रीय सामंत घराणे

मेघचंद्राच्या 'यक्षदेवग्रद्धान्वया'तील जैत्रपाळविषयक माहितीच्या आधारे शोध घेताना प्रा. र. न. भुसारी यांनी 'यक्षदेवग्रद्धान्वया'तील माहितीला आंध्रच्या इतिहासातून पुष्टी देण्याचा प्रयत्न केला आहे. प्रस्तुत संदर्भात ते लिहितात :

"जैतपाळाचा धाकटा बंधु महादेव व पुतण्या सारंगु—ज्याला पुढे जैतपाळाने दत्तक घेऊन आपले राज्य दिले-यांचा महाराष्ट्राच्या इतिहासात कोठेच उल्लेख नसला, तरी आंध्र प्रांताच्या इतिहासात या दोघा पितापुत्रां-संबंधी माहिती उपलब्ध आहे. वरंगळचा आंध्र राजा काकतीय गणपतिदेव (सन ११९९) याचा मनुमसिद्धी नावाचा एक मांडलिक असून तो नेल्लोर येथे राज्य करीत होता. सुप्रसिद्ध तेलगू भारतकार तिक्कण्णा हा याच मांडलिकाचा मंत्री होता. तिक्कण्णाने आपल्या निर्वचनोत्तर रामायणात मनुमसिद्धीच्या पराक्रमवर्णनप्रसंगी 'महाराष्ट्रसामंत सारंगु' या नावाने एका महाराष्ट्रीय संस्थानिकाचा उल्लेख केला आहे. याशिवाय 'नेल्लोर-दानशासन, भाग ३, नं. ७६ या लेखात या महाराष्ट्र-सामंतासंबंधी बरीच हकीकत आली आहे. त्यावरून चिलकुरी वीरभद्र राव या गृहस्थाने 'आंध्रुलचरित्रमु' या तेलगु ग्रंथात या सामंताचा थोडक्यात इतिहास दिला आहे. त्यामध्ये सारंगाच्या बापाचे नाव महादेवनायक असून तो सन १२१० च्या सुमारास—महादेवाचे लेख सन १२१० ते १२४७ पर्यंत उपलब्ध आहेत—अद्दंकी सीमेवर ( गुंतुर जिल्हा ) राज्य करीत होता, असे दिसते. या महादेवास (१) सिंगलदेव, (२) सारंगपाणि, (३) गोपालदेव असे तीन पुत्र होते. त्यांपैकी दुसरा पुत्र सारंगपाणि हाच 'यक्षदेवग्रद्धान्वया'तील जैतपाळाचा दत्तकपुत्र असावा. वडील बंधु जैतपाळ महाराष्ट्रात राज्य करीत असताना महादेवाने मुलुखगिरी करून तेलंगणाचा काही भाग बळकावला असेल. शिवकालीन इतिहासातही असा प्रकार झालेला आहे. शिवाजीचे महाराष्ट्रावर स्वामित्व असताना व्यंकोजी तंजावरासारख्या दूर प्रांतावर आपला अधिकार चालवीत होताच. 'विवेकसिन्धू'तील शके १११० अथवा साधारण संवत्सरावरून शके १११२ हा काल महादेवनायकाच्या वर दिलेल्या काळापासून फार

२२. 'श्रीचक्रधरचरित्र' : डॉ. वि. भि. कोलते, पृ. २-३ ( तळटीप. )

२३. 'लीळाचरित्र', एकांक, लीळा क्र. १२.





दूर नाही. तेव्हा मेघचंद्राने 'यक्षदेवनृद्धांन्वया'त जैतपाळा-संबंधाने जी माहिती दिली आहे, ती असत्य नसून, तेलगू इतिहासावरून तिला सत्यांचा आधार आहे, हे वाचकांस कळून येईल.[२४]

### झाडीमंडळातील सारंगधर राजा आणि मुकुंदराज समाधी

प्रा. भुसारींनी पुरविलेली माहिती प्रस्तुत संदर्भात निश्चितपणे महत्त्वाची आहे. अद्दंकीचे हे महाराष्ट्रीय राजे आपल्याला सेऊणदेशाचे ( देवगिरि–नाशिक–खानदेश विभागातील ) म्हणवीत. हे घराणे प्रथम चोळांचे मांडलिक होते. इ. स. १२२८ च्या सुमारास गणपती काकतीयाने अद्दंकीवर विजय मिळविल्यानंतर हे घराणे काकतीयांचे मांडलिक बनले.[२५] या घराण्यातील महादेवाचा मध्यम पुत्र सारंगधर हाच जर झाडीमंडळातील जैतपाळाचा दत्तकपुत्र असेल, तर झाडीमंडळात त्याची राज्यस्मृती जिवंत असावयास हवी आणि आश्चर्य असे की, स्थानिक पातळीवर झाडीमंडळात सारंगधराची राज्यस्मृती जिवंत आहेही.

मेहकर ( जि. बुलढाणा ) येथील पुराणप्रसिद्ध शार्ङ्गधराची मूर्ती पंचाहत्तर वर्षांपूर्वी घराचा पाया खणीत असताना एका चंदनी पेटीत सुरक्षित स्थितीत सापडली. त्या पेटीत मूर्तीवर आच्छादन म्हणून अनेक ताम्रपट होते. स्थानिक मंडळींच्या माहितीनुसार मूर्ती आणि ताम्रपट परदेशी जाण्याची शक्यता होती. परंतु त्या वेळच्या हिंदू तहसीलदाराच्या आस्थेमुळे मूर्तीची प्राणप्रतिष्ठा मेहकरातच झाली. ताम्रपट मात्र नंतर कोठे गायब झाले, ते कोणालाच सांगता येत नाही. ताम्रपट जेव्हा उपलब्ध झाले, तेव्हा त्यातील आशयाविषयी काही जाणत्यांची चर्चा झाली असावी, असे मानण्यास जागा आहे. श्री. विनायकराव करंदीकर नामक व्यक्तीने मेहकरजवळील जानेफळ येथे असलेल्या मुकुंदराज-समाधीसंबंधी रचलेले श्लोक जानेफळ येथे मुकुंदराज-समाधि–मंदिरात लिहून ठेवलेले आहेत. आणि तेच श्लोक श्री. यशवंत खंडेराव कुलकर्णी यांच्या घरच्या एका वहीतही नोंदविलेले आहेत. त्या श्लोकांतील माहितीला शार्ङ्गधर-मूर्तीबरोबर सापडलेल्या ताम्रपटाचा आधार वापरला आहे. ते श्लोक आणि स्थानिक मंडळींनी पुरविलेली मौखिक परंपरेने चालत आलेली माहिती यांनुसार मेहकरच्या सारंगधर-मूर्तीशी स्थानिक सारंगधर नामक राजाचा संबंध होता. हा सारंगधर राजा मुकुंदराजांचा – ज्यांची समाधी जानेफळ येथे आहे त्यांचा – शिष्य होता. त्याने वसविलेले सारंगपूर नावाचे गाव मेहकरपासून तीन-चार मैलांवर आहे. ( श्री. विनायकराव करंदीकर व श्री. यशवंतराव कुलकर्णी हे दोघेही दिवंगत आहेत. त्यांचे चिरंजीव अनुक्रमे यवतमाळ व मेहकर येथे राहतात. )

मेहकर–जानेफळ हा भाग झाडीमंडळातच मोडत असल्यामुळे हा सारंगधर राजा जैत्रपाळसंबंधित असण्यास अडचण उरत नाही. तसेच, अद्दंकीच्या महादेवाचा पुत्र सारंगधर आणि हा झाडीमंडळातील सारंगधर एकच असावा, असे मानण्यासही एक लहानसा आधार आहे. अद्दंकीच्या सारंगधराने सारंगपूर नावाचे गाव वसवून ते सत्तेचाळीस ब्राह्मणांना लावून दिल्याचा उल्लेख आंध्रच्या इतिहासात सापडतो.[२६] मेहकरजवळचे सारंगपूर सारंगधराने वसविल्याची स्मृती मेहकरच्या परिसरात अजून जिवंत आहे. तेव्हा प्रा. भुसारींचे अनुमान सत्याच्या जवळ जात आहे, असे वाटते.

### आणखी पुरावे हवेत

मुकुंदराज ही प्राचीन मराठी साहित्य व संस्कृती यांच्या इतिहासातील एक जटिल समस्या आहे. या समस्येची उकल करावयास आवश्यक तेवढी सामग्री अजून उपलब्ध झालेली नाही. ओझरत्या आणि संदिग्ध स्वरूपाच्या उल्लेखांच्या आधाराने भूतकालाच्या मौनाला वाचा फोडण्याचे काम करीत राहावे लागत आहे. परंतु त्याचा मख्खपणा पूर्णतः दूर करावयास तो आधार पुरा पडत नाही. यापूर्वी अपुऱ्या साधनांच्या आधारे मी मुकुंदराजांच्या गुरुपरंपरेवर आणि एतद्विषयक इतरही अनेक लहान लहान प्रश्नांवर वेगळा प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केला आहे. येथे जैत्रपाळ–समस्येची उकल करण्याचा–निदान तशी उकल करण्याची एक दिशा दाखविण्याचा–प्रयत्न केला आहे. मला याची जाणीव आहे की, या लेखातील प्रतिपाद्य केवळ अनु-

२४. 'साहित्य आणि संशोधन' : प्रा. र. म. भुसारी, पृ. १०–११.

२५. वरंगलचे काकतीय राजे : कृष्णा कुमार, पृ. १०२

२६. 'वरंगलचे काकतीय राजे' : कृष्णाकुमार, पृ. १०३.

मानाच्या पातळीवरचे आहे. त्याला सिद्धांताची प्रतिष्ठा लाभण्यासाठी आणखी पुरावे हवेत.

मला स्वतःला आंध्रच्या इतिहासाचे साक्षात् ज्ञान नाही. अद्दंकीचा महादेव हाच जैत्रपाळाचा धाकटा भाऊ होय, हे निःसंदिग्धपणे सिद्ध व्हावयाचे असेल, तर त्याचा पिता वल्लाळ व पितामह नृसिंह होता, याला आंध्रच्या इतिहासातून पुष्टी मिळावयास हवी. अद्दंकीच्या महादेवाच्या पित्याचे नाव वल्लाळ होते, असे साधार सिद्ध करता आले, तर तो आपणांस अभिप्रेत असलेल्या जैत्रपाळाचा बंधु होता, असे सिद्ध करणे शक्य होईल. तसेच, अद्दंकीच्या सारंगधराने वसविलेले सारंगपूर मी मेहकरजवळच्या सारंगपुराशी एकात्म मानून, त्या आधारे अद्दंकीचा सारंगधर आणि झाडी-मंडळातील सारंगधर एक असावा, या अनुमानाला पुष्टी दिली आहे. परंतु आंध्रच्या इतिहासाभ्यासकांनी तेथील सारंगधराने वसविलेले सारंगपूर आंध्रमध्येच असल्याचे दाखविले असेल, तर माझे अनुमान दुबळे ठरेल. या दिशेने अभ्यासकांनी अधिक शोध घ्यावा, एवढेच या लेखाचे प्रयोजन आहे.

●●●

# सोंडवाला गणपती

मल्हार विनायक आपटे

वैदिक परंपरेत दैवतांची संख्या पुष्कळ मोठी आहे. तरी गणपती हे दैवत सर्वमान्य असून अग्रगण्य आहे. सर्व धर्मकृत्यांत प्रथम पूजा गणपतीची करतात. दैवते विविध होऊन समाजास फुटीर रूप येऊ लागले तेव्हा एकीकरणार्थ धुरिणांनी ही चाल पाडलेली आहे. गेल्या शतकाअखेर लोकमान्य टिळकांनी गणपती-उत्सव सुरू केला त्यातील बीज हेच होते. हिन्दू लोकांत सर्वमान्य दैवत गणपती हे आहे. त्याबद्दल कोणाचाच मतभेद नाही. तेव्हा त्याचाच उत्सव करा असा तो उपक्रम होता. लोकमान्यांच्या उत्तर आयुष्यात गणपती-उत्सवांत त्यांची जी भाषणे झाली ती त्यांच्या गीतारहस्य ग्रंथास अनुलक्षून होती. उत्सव सुरू करताना त्यांनी गणपतींच्या गजानन या रूपाविषयी काही विवेचन केले असल्याचे माहीत नाही. वैदिक वाङ्मयात गणपती आहे पण सोंडवाला नाही. अथर्वशीर्षात गणपतीस ओंकार-रूप दिले असून त्याचाच ज्ञानेश्वरीत स्वीकार आणि विकास केलेला आहे. गजानन हे ते विकसित रूप आहे. गणपती गजमुख कसा झाला? का झाला? केव्हा झाला? या प्रश्नांची उत्तरे पाहिजे आहेत. पुराणान्तरी गणपतीच्या जन्मकथा पुष्कळ आहेत. गणपतीला सर्वांनीच शिव व पार्वती यांचा पुत्र मानले आहे. तथापि त्याच्या जन्माच्या कथा चमत्कारिक आहेत. तो पार्वतीच्या पोटी जन्मला असे कोणी सांगितले नाही. तो काही चमत्कारांनी उत्पन्न झाला आणि त्याला शिवपार्वतींनी आपला पुत्र मानला, असा सर्व कथांचा आशय आहे.

गणपतीच्या कथांत दोन गोष्टी चमत्कारिक आहेत. एक त्याचा सोंडवाला मुखवटा आणि दुसरे त्याचे वाहन उंदीर. गणेश ओंकाररूप आहे असे वर्णन आहे. ओंकाराची आकृती ॐ मानवी मेंदूत आहे हे लक्षात आणले म्हणजे सोंड कशावरून सुचली ते समजते. या आकृतीत सोंडेचे वळण आहे. ओंकार हा प्रथम वाचा-प्रतीक अ ऊ म यांचा समुच्चय खरा पण त्याला मस्तकातील विवरांच्या दर्शनाने नवी आकृती मिळाली. तिच्यात या सोंडेची आकृती आहे. इतकेच काय तर सोंडेसकट गजमस्तकाची आकृती तिच्यात आहे. एकदा या ओंकाराकृतीवरून गजमस्तकाची कल्पना सुचल्यावर हरएक प्रकारे गजमस्तकधारी मनुष्यरूपाच्या समर्थनपर अनेक रूपकात्मक कथा निघाल्या असे दिसून येते. तथापि उंदीर आणि गणपती यांच्या परस्परसंबंधातली एखादी कथा ऐकिवात नाही. असे असले तरी त्यासंबंधी चांगला तर्क मात्र करता येतो. सोंडेची कल्पना मनुज-मस्तकातील विवरांच्या आकृतीवरून सुचली तशी ही सुद्धा सुचली असणे अगदी शक्य आहे.

गणपतीचे वाहन उंदीर असे आपण समजतो पण हा समज मूळचा नव्हे. उंदीर हे गणपतीचे ध्वजचिन्ह आहे. गणेश-अथर्वशीर्षात ' मूषक-ध्वजम् ' अशी गणपतीची ध्यानप्रशंसा केलेली आहे. विष्णूला प्रथम गरुड-ध्वज म्हटले आणि मग त्याचे वाहन गरुड मानले. शिवाला प्रथम ' वृषभ-ध्वज ' म्हटले आणि मग वृषवाहन मानले. गणपतीचे स्थूलरूप पाहता त्याला मूषकवाहन म्हणण्यापेक्षा मूषकध्वज मानणेच अधिक स्वाभाविक आहे. पण मूषक हे ध्वजचिन्ह तरी कशावरून सुचले आणि ते कशाचे द्योतक आहे? हे प्रश्न शिल्लक राहतातच. मानवी मेंदूतील विवरांचा पाठीमागून पाहिलेला देखावा उंदरासारखा दिसतो, हे त्या प्रश्नांपैकी पहिल्याचे उत्तर आहे. या देखाव्यात उंदराचे तोंड वरती, दोन बाजूला दोन दोन पाय, आणि खाली लांबच लांब शेपूट असे अवयव दिसून येतात. मेंदूचे चौथे विवर आणि त्याला लागून असलेल्या पाठकण्यातील रज्जूतील पोकळी यांचा देखावा मूषकाचा भास उत्पन्न करणारा असतो. ही पोकळी म्हणजे योग-ग्रंथात सांगितलेली ब्रह्मनाडी होय. उंदराची आकृती असणारे विवर ते आजच्या भाषेत मेंदूतील चौथे विवर असते. या विवरालाच त्या ग्रंथात शंख-नाडी असे म्हटलेले आहे. निमुळते टोक खाली करून शंख जर धरला तर तो उंदराच्या अंगासारखा दिसतो. हे निव्वळ काव्य आहे. या शंख-नाडीच्या वर शून्य देश आहे

आणि त्याचे शिखर तेच ब्रह्मरंध्र होय. हल्लीच्या भाषेत शून्य देश ते तिसरे विवर. त्याला डाव्या उजव्या विवराशी जोडणारे रंध्र तेच ब्रह्मरंध्र ठरते. (षट्चक्रदर्शन ४० )

ध्वजचिन्ह म्हणून उंदराची योग्यता कोणा ग्रंथकाराने सांगितलेली नाही. उंदीर हा अगदी क्षुद्र पशू आहे, हे खरे. पण त्याच्या अंगी काही विशेष गुण आहेत ते त्याला माणसाच्या जवळ आणून भिडवतात. उंदीर हा महाउद्योगी पशू आहे त्याच्या आकाराच्या मानाने पाहता त्याचे उद्योगी शील विशेष कौतुकास्पद आहे, इतकेच नव्हे तर त्याची बुद्धिमत्ताही प्रशंसनीय आहे. उंदीर मनुष्यवस्तीत राहतात. ते माणसांचेच अन्न खातात; विशेषतः धान्याची नासाडी फार करतात. उंदराला पकडण्याकरता तऱ्हेतऱ्हेचे पिंजरे करून पाहिलेले आहेत. कोणताही एक प्रकारचा पिंजरा फार काळ उंदराची वंचना करू शकत नाही. काही थोडे उंदीर अडकले की इतर त्या पिंजऱ्यापासून दूर राहतात. आधुनिकांच्या अनुभवावरून पाहता उंदराची पचनेंद्रिये माणसाच्या पचनेंद्रियांशी इतर पशूंच्यापेक्षा अधिक सदृश आणि सधर्मी असतात. उंदरावर केलेले प्रयोग माणसाला विशिष्ट कोष्टकानुसार लागू पडतात. यावरून उंदराला गणपतीच्या ध्वजावर स्थान मिळाले असे मात्र नाही. ते मेंदूच्या विवराच्या आकृतीवरूनच मिळाले आहे.

गणपती हा शिवपार्वती यांचा पुत्र आहे ही कल्पना कशी निघाली हा प्रश्न सोडविण्याकरता हठयोग-वाङ्मयाचा उपयोग होतो. हठयोगाचे ग्रंथकार आपले दैवत शिव हेच सांगतात. शिवसंहिता याच नावाचा एक हठयोग-ग्रंथही आहे. हठयोगी असेही मानतात की, माणसाच्या मस्तकात शिवाची वस्ती असते. ते असे मानतात की, योगसिद्धी म्हणजे शिव व शक्ती यांचे मीलन होय. शक्ती म्हणजे कुंडलिनी शक्ती; ही शक्ती मूलाधारात सुप्त असते. प्राणायाम केल्याने ती जागृत होते. आणि सुषुम्णामार्गे वर मस्तकापर्यंत चढते. तेथे तिचे शिवाशी मीलन होते तेव्हा योग्यास सत्यज्ञान प्राप्त होते. त्याकरता ही शक्ती ब्रह्मरंध्रापर्यंत चढवावी लागते. हे कठीण आहे. पण तपश्चर्येने हे घडते. शिवाप्रमाणेच शक्तीही अदृश्यच असणार, पण ती ज्या मार्गे वर चढते तो मार्ग दृश्य आहे. सुषुम्णानाडी हा तो मार्ग मूलाधारापासून तो थेट मस्तकापर्यंत आहे हे उघडच आहे. या मार्गात साडेतीन वेढे असतात असे वर्णन योगग्रंथात आहे. पाठकण्यास पुढे-मागे अशी चार वळणे आहेत. त्या कण्याच्या आत रज्जू आहे. ही रज्जू चैतनगात्रांची बनलेली आहे ती केवळ कमरेपर्यंतच, पण तेथून खाली मूलाधारापर्यंत सूत्रल धागा आहे. तोही या मार्गाचाच एक भाग म्हटला म्हणजे मार्ग पुरा होतो. मान, छाती, उदर आणि कटीर यांत या मार्गास एकेक वळण असते. या चार वळणांपैकी मानेतले वळण अगदी थोडके असते म्हणून ते अर्धे म्हटले तर वळणे साडेतीन असतात असे म्हणणेही चालण्याजोगे आहे. कुंडलिनी शक्ती म्हणून जी सांगितलेली आहे तिला सार्धत्रिवृत्ताकृतिः असे षट्चक्रदर्शनग्रंथात म्हटले आहे. ( श्लोक १० ) ते तिच्या मार्गाच्या आकृतीवरून म्हटलेले दिसते.

योगग्रंथात शिवशक्तिमीलन सांगितलेले आहे पण त्यातून गणपतीचा जन्म सांगितलेला नाही. मीलनाचे फळ म्हणजे ब्रह्मज्ञानाची प्राप्ती असे सांगितलेले आहे. गणपती जर ब्रह्मस्वरूप असेल तर ज्ञानप्राप्ती म्हणजेच गणपतीचा जन्म होय. अर्थात् ही कल्पना योगग्रंथकारांची नाही. तदनंतरच्या पुराणकारांची आहे. हठयोगग्रंथाचे कर्ते निवृत्तिपंथी आहेत. मोक्ष हेच त्यांचे परमसाध्य आहे. ते कुंडलिनीच्या चालनेने मिळते असे ते सांगतात. तथापि गणपतीचे उपासक केवळ मोक्षप्राप्ती सांगतात असे नाही. गणपती हा शिवपार्वतीचा पुत्र त्यांनी योद्धा केलेला आहे. त्याने अनेक दैत्यांचा नाश करून भक्तांना ऐश्वर्यलाभ करून दिलेला आहे. हा गणपती ऋद्धि-सिद्धींचा पती आहे. तो जगदुत्पादक आहे तसा जगत्-चालकही आहे. शिव हा यतिश्रेष्ठ, त्याचा पुत्र गणपती कल्पून तो विद्याधिपती मानून, या नव्या सांप्रदायिकांनी आपले जुन्याशी नाते जोडून ठेवले आहे.

योगी लोकांना जे शिवदर्शन घडते त्याचे लौकिक वर्णन शिवमहिम्नस्तोत्रात आढळते ते असे :—

मनः प्रत्यक्चित्ते सविधमवधात्तमरुतः ।
प्रहृष्यद्रोमाणः प्रमदसलिलोत्संगितदृशः ॥
यदालोक्याल्हादं ह्रद इव निमज्यामृतमये ।
दधत्यन्तस्तत्त्वं किमपि यमिनस्तत् किल भवान् ॥२४॥

यती प्राणायामपूर्वक मनात विधियुक्त आत्मचिंतन करतात तेव्हा त्यांची स्थिती अमृताच्या डोहात बुडाल्यासारखी होते. ते रोमांचित होतात आणि त्यांच्या डोळ्यांत आनंदाश्रू येतात. ज्या अंतस्तत्त्वाचे आकलन

झाले असता हे घडते ते तत्त्व, हेच तुझे खरे स्वरूप आहे.

शिवाचे विशालस्वरूपही याच स्तोत्रात सांगितलेले आहे ते असे :—

वियद्व्यापी तारागणगुणितफेनोद्गमरुचिः।
प्रवाहो वारां यः पृषतलघुदृष्टः शिरसि ते॥
जगत् द्वीपाकारं जलधिवलयं तेन कृतमित्यने-
नैवोन्नेय धृतमहिम दिव्यं तव वपुः॥१७॥

सर्व आकाश व्यापणारा आणि फेसासारखा दिसणारा ठिपकेदार आकाशगंगेच्या पाण्याचा प्रवाह तुझ्या डोक्यावरुन निघालेला दिसत आहे त्याचा एवढा मोठा वेढा या जगाभोवती पडला आहे की ते जग एखाद्या लहानशा द्वीपासारखे भासत आहे. यावरूनच तुझे शरीर केवढे मोठे आहे याविषयी तर्क करावा लागतो.

आकाशात मृगनक्षत्राचे तारे आहेत. त्याच्या पुढे रोहिणी नक्षत्र आहे आणि मागे व्याध आहे. व्याध हेच शिवाचे रूप आहे. त्याने मारलेला बाण मृगाच्या अंगात अजून दिसत आहे अशी एक कथा रूढ आहे. ती मृगातला वसंतसंपात रोहिणीत आल्यावरून रचली गेली आहे. ही कथा आणि त्यानंतरची मदनदहनाची कथाही प्रस्तुत स्तोत्रात उल्लेखिलेली आहे. मदनदहनाची कथा कार्तिकेय-जन्मास अनुलक्षून आहे, आणि कार्तिकेय-जन्म ही रोहिणीतून कृत्तिकात वसंतसंपात गेल्याची खूण आहे. कार्तिकेयालाही शिवपार्वतीपुत्र म्हटलेले आहे. कुमारसंभव काव्यातील आधारकथा हीच आहे. ही कथा इतकी चमत्कारिक आहे की ती रूपकात्मक आहे असे मानल्याखेरीज गत्यंतर नाही. आपल्या कुमारसंभव नामक महाकाव्यात ज्या कार्तिकेयाचे वर्णन कालिदासाने विस्तारशः केले त्याचेच संक्षेपाने वर्णन त्याने आपल्या लघुकाव्यात केले आहे ते असे :—

रक्षाहेतोर्नवशशिभृता वासवीना चमूनाम्
अत्यादित्यं हुतवहमुखे संभृतं तद् हि तेजः
॥ मेघदूत. पूर्व ४६ ॥

कार्तिकेय म्हणजे इंद्राच्या सैन्याचे रक्षण करण्याकरता, चंद्रकला धारण करणाऱ्या ईश्वराने अग्निमुखात ठेवलेले सूर्यापेक्षाही प्रखर असे तेज आहे.

देवसेना घेऊन कार्तिकेयाने ज्या दैत्याला मारला त्याचे नाव तारकासुर असे आहे. या नावावरून ताऱ्यांशी संबंध सूचित होतो. वसंत-संपाताची सूचना मदनाचा सखा वसंत यावरून मिळते. अकाली वसंतावतार झाला असा उल्लेख आहे. मदनाचे दहन आणि त्याचा पुनर्जन्म यावरून वसंतसंपाताचा निराळ्या नक्षत्रात प्रवेश सूचित होतो. परमेश्वराची लीला ही शिवपार्वती यांच्या विवाहात प्रतीत होते. अग्नीचे तेज गंगेत आणि गंगेचे कृत्तिकात गेल्याने कार्तिकेयाचा जन्म झाला. गणपती हा कार्तिकेयाचा धाकटा भाऊ मानलेला आहे. अर्थात त्याचा जन्म कृत्तिकानक्षत्रात वसंतसंपात आल्यानंतरचा असला पाहिजे. या गोष्टीस दोन अडीच हजार वर्षे झाली असावीत असा तर्क होतो. हल्ली संपात उत्तराभाद्रपदा नक्षत्रात आहे. तीन हजार वर्षांपूर्वी तो कृत्तिकात होता. सोंडवाल्या गणपतीच्या कथा यापेक्षा जुन्या नाहीत.

●●●

## साधारण सभासदांना वर्गणीबाबत विनंती

परिषदेचे वर्ष सुरू होऊन नऊ महिने लोटले. वर्गणी वर्षाच्या पहिल्या तिमाहीत यावयाची असते. अद्याप बऱ्याच सभासदांकडून वर्गणी यावयाची आहे. ती पाठविण्याबाबत बाकीदारांना स्वतंत्ररीत्या स्मरणपत्रे पाठविली आहेत.

सर्व बाकीदार सभासदांनी आपली वर्गणी लवकरात लवकर पाठवावी अशी विनंती आहे.

आपले
मो. रा. वाळंबे
ग. ल. ठोकळ
द. बा. डावरे
चिटणीस

# शब्दवेध

## ४ : वाङ्मय, साहित्य

मागील अंकातील ' शब्दवेधा 'च्या प्रास्ताविकामध्ये डॉ. पानसे यांनी वाङ्मय आणि साहित्य या शब्दांचा उल्लेख केला होता. त्या शब्दांविषयीच आज हे टिपण पाठवीत आहे; अलीकडे वाङ्मय आणि साहित्य हे दोन शब्द अगदी समानार्थक आहेत असे समजून त्यांचा वापर चालू आहे हे ' ललित साहित्य ' असाही जो प्रयोग होत असतो त्यावरून स्पष्ट होत आहे. वास्तविक ' साहित्य ' म्हटल्यावर त्याचे इतर वाङ्मयापासून वैलक्षण्य व्यक्त करण्यास ' ललित ' हा शब्द जोडण्याची आवश्यकता नाही. कारण, साहित्य म्हणजे ललितवाङ्मयच होय अशी जुनी कल्पना होती, आणि त्यात काव्य-नाटक-कथा यांचाच समावेश होई. 'साहित्य–दर्पण' किंवा त्यासारख्या 'साहित्य–मीमांसा' ' साहित्यचंद्रिका ', ' साहित्यकल्पद्रुम ', ' साहित्य-कौमुदी ' इत्यादी अनेक साहित्यविचार करणाऱ्या पूर्वीच्या ग्रंथांतून काव्य व नाटक इत्यादी ललित वाङ्मयाविषयीच विचार करण्यात येई. त्याखेरीज इतर वाङ्मयाचा उल्लेख शास्त्रे, इतिहास-पुराण इत्यादी शब्दांनी होत असे. साहित्य या अर्थाने ' काव्य ' या शब्दाचाही उपयोग होई हे ' काव्येषु नाटकं रम्यम् ' या वचनावरून दिसून येते. सारांश, साहित्य हा शब्द ललित नसणाऱ्या वाङ्मयाबद्दल केव्हाही योजिला जात नसे. म्हणून त्याचा उल्लेख ' ललित साहित्य ' असा करण्याची आवश्यकता नाही; अर्थपुनरुक्तीचा तो दोषही ठरेल. वाङ्मय हा शब्द अधिक व्यापक अर्थाचा वाचक होता व आहे. संस्कृतमध्ये साहित्यविचारात त्याचा क्वचितच आढळ होतो. बहुधा वाङ् + मय = वाग् + विषयक, वाचामय, शब्दग्रथित अशा अर्थाने त्याचा उपयोग होई. दण्डीच्या ' आदिराजयशोबिंबं आदर्शं प्राप्य वाङ्मयं ' या श्लोकात वाङ्मय हे आदर्श या शब्दाचे वर्णनात्मक विशेषण आहे; तसाच उपयोग 'इत्येषा **वाङ्मयी** पूजा श्रीमच्छंकरपादयोः' या ठिकाणीही आहे. वाङ्मय या शब्दाचा नाम म्हणून उपयोग कालिदासाने दोन ठिकाणी केला आहे. रघुवंशात ' लिपेर्यथावद्ग्रहणेन वाङ्मयं नदीमुखेनैव समुद्रमाविशत् ' या ठिकाणी समग्र शब्दबद्ध वाङ्मय अभिप्रेत आहे; केवळ साहित्य, ललित वाङ्मय नव्हे. कुमारसंभवात ' द्विधा प्रयुक्तेनच **वाङ्मयेन** सरस्वती तन्मिथुनं नुनाव ' या ठिकाणी स्तुतीचे स्वरूप त्या **वाङ्मयाला** असल्याने ते कदाचित काव्य असण्याचा संभव आहे. तथापि या ' द्विधाप्रयुक्त वाङ्मया 'चा अर्थ टीकाकार संस्कृत आणि प्राकृत वाङ्मय असा देतात. मल्लिनाथ रघुवंशा-मध्ये वाङ्मय म्हणजे शब्दजात आणि कुमारसंभवात 'शब्दजाल' असे अर्थ देतो. सारांश, वाङ्मय शब्द व्यापक अर्थाचा वाचक असून त्यात ललित तसे ललितेतर असे दोन्ही प्रकारचे वाङ्मय येईल. साहित्य हा मर्यादित अर्थाचा शब्द असून त्यात केवल ललित वाङ्मय येईल. या दोनही शब्दांबाबत व्युत्पत्तीचा आश्रय करून काही अर्थनिश्चिती करण्याचा प्रयत्न फारसा फलदायक होणार नाही.' शब्दार्थौ सहितौ काव्यम् ' म्हटले तर सर्वच वाङ्मय साहित्यात बसेल, आणि तसे ते बसत नव्हते हे तर उघड आहे आणि वाक्-वाचा मय असे म्हटल्याने बोललेले सारे 'वाङ्मया'त यावयास हवे, आणि ते तसे येत नाही हे स्पष्ट आहे. इंग्रजीमध्ये literature हा एकच शब्द उपलब्ध आहे. मुळात त्याचा अर्थ ' साहित्य ' असा आहे. पण ' वाङ्मय ' या व्यापक अर्थाचा दुसरा शब्द नसल्याने त्याचाच उपयोग साहित्येतर वाङ्मयाबरोबर त्या त्या विशिष्ट प्रकाराचा वाचक शब्द जोडून करण्यात येतो हे philosophical literature यासारख्या शब्दप्रयोगा-वरून दिसून येते. परंतु इंग्लिश भाषेने तसे केले म्हणून आपल्यास दोन भिन्न अर्थ व्यक्त करणारे शब्द उपलब्ध असता आपणही करण्याचे कारण नाही.

## ५ : अर्वाचीन, आधुनिक

वाङ्मयाच्या संदर्भात ' अर्वाचीन ' आणि 'आधुनिक' या दोन शब्दांचा उपयोगही एकाच अर्थाने अलीकडे करण्यात येत आहे. ' आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास ' ( अ. ना. देशपांडे ), ' आधुनिक मराठी कविता ' ( भ. श्री. पंडित ) ही ग्रंथांची नावे याची ठळक उदाहरणे आहेत. ' आधुनिक भारत ' (जावडेकर) हेही प्रसिद्ध असे उदाहरण होय. ' आधुनिक ' शब्दाचा अर्थ पाहता ही नावे समर्पक ठरत नाहीत. ' अधुना ' या

शब्दापासून आधुनिक हा शब्द निघाला असून ह्याचा अर्थ ' अस्मिन् काले ', ' आज ' असा आहे. आपटे व मोनियर विल्यम्स् त्याचे अर्थ of the present moment, belonging to present times असे देतात. अमरकोशात ह्याचे पर्याय म्हणून संप्रति, सांप्रतम्, इदानीं असे शब्द दिले आहेत. याचा अर्थ आधुनिक म्हणजे आजकालचे, सद्यःकालीन, लेखक-समकालीन किंवा contemporary असे काही असा होतो. ' अर्वाचीन ' ( अर्वाक्=अलीकडे ) या शब्दाचा अलीकडचे असा अर्थ आहे. हे ' अलीकडचे ' अर्थात ' प्राचीनां'च्या तुलनेने ' अलीकडचे ' असे वाङ्मय 'आजचे' वाङ्मय होऊ शकत नाही. इंग्रजीतील modern आणि contemporary या दोन शब्दांतील अंतर व्यक्त करावयाचे झाल्यास modern याला ' अर्वाचीन ' हा शब्द आणि ' contemporary ' याला ' आधुनिक ' हा शब्द योजिणे उचित ठरेल. आज लिहिणाऱ्या लेखकाने गेल्या शतकातील वाङ्मयाबाबत किंवा परिस्थितीबाबत ' आधुनिक ' शब्द योजून चालणार नाही. एकंदर मानव अथवा सृष्टी यांच्या जीवनात ' आज ' हा शब्द हजार वर्षेसुद्धा व्यापील; परंतु इतके आयुर्मान नसलेल्या विषयांबाबत अर्वाचीन आणि आधुनिक या शब्दांच्या उपयोगामध्ये वर दर्शविलेला विवेक करावयास हवा असे वाटते.

रा. श्री. जोग

◆ ◆ ◆

## ६ : शास्त्र, -विज्ञान, -मीमांसा इत्यादि

अभ्यास करण्यासारखे जे जे आहे त्याची क्षेत्रवार विभागणी करून एका वेळी एकाच विभागावर लक्ष केंद्रित करण्याची प्रथा आहे. शाळेच्या वेळापत्रकात आपण त्यांना अभ्यासाचे विषय ( subjects of study ) म्हणतो, संशोधनाच्या अधिक भारदस्त संदर्भात त्यांना ज्ञानक्षेत्रे ( fields of study ) म्हणण्यात येते. ( इंग्लिशमधील discipline ह्या तिसऱ्या शब्दप्रयोगाची ओळख interdisciplinary seminar सारख्या नव्या भानगडीमुळे आपल्या आताच कुठे होते आहे हे पाहण्याजोगे आहे ! त्या शब्दप्रयोगामागील आशयाशी तर आमची भेट अजून व्हायचीच आहे असे म्हणण्याची पाळी आपल्यावर अनेकदा येते. ) असो. ह्या विषयांना नावे देताना शास्त्र हे उत्तरपद वारंवार येते, त्या आणि तत्सम इतर उत्तरपदांबद्दल थोडेसे. इंग्लिशमध्ये logy किंवा ics ( क्वचित ic उदा. logic ) ही उत्तरपदे ऐतिहासिक योगायोगाने निवडली गेली आहेत. आपल्याला मात्र कोणत्या विषयाला शास्त्रान्त नाव द्यायचे, कोणत्या विषयाला नाही ह्याबद्दल काही धोरण ठरवता येणे अजून तरी शक्य आहे.

Science ह्या शब्दाला प्रथम **शास्त्र** आणि अलीकडे **विज्ञान** हे प्रतिशब्द रूढ झाले आहेत. **शास्त्र** ह्या शब्दाला मूळचा अर्थ आदेशांची व्यवस्था, विशेषतः परंपरागत आदेशांची व्यवस्था असा आहे आणि तो शास् धातूच्या अर्थाला सुसंगत आहे. नवा अर्थ आदेशांची व्यवस्था असा नसून वस्तुस्थितिदर्शक विधानांची व्यवस्था असा आहे. ह्या दोन्ही अर्थांचे गोत्र निराळे असल्यामुळे **शास्त्र** आणि त्यापासून साधलेल्या **शास्त्रज्ञ, शास्त्रकार, शास्त्री, शास्त्रशुद्ध, शास्त्रीय, शास्त्रपूत, सशास्त्र, शास्त्रोक्त, अशास्त्रीय** ह्यासारख्या शब्दांची ओढाताण झालेली आपल्याला दिसते. **विज्ञान, वैज्ञानिक, -विद्** ( उत्तरपद म्हणून ), **अवैज्ञानिक** ह्या शब्दांची मदत ह्यासाठी घेता येण्यासारखी आहे. मात्र आपण ती अजून मोकळेपणाने घेतलेली नाही. त्याहून वाईट म्हणजे आधुनिक विज्ञानक्षेत्रांची परंपराबद्ध आदेशात्मक ' शास्त्रे ' बनवण्याचा उद्योग आपण कधी-कधी करतो ही डॉ. प्रबोध पंडितांची तक्रार वाजवी असल्याचे आपल्याला दिसून येते !

ह्यातून मार्ग काढायचा म्हणजे **शास्त्र** शब्दाला त्याला पेलत नसलेल्या जबाबदारीतून मुक्त करणे, प्राणिशास्त्र वनस्पतिशास्त्र, खगोलशास्त्र इत्यादी विज्ञानशाखांना पुढीलप्रमाणे नावे द्यावीत :

प्राणिविज्ञान zoology
वनस्पतिविज्ञान botany
जीवविज्ञान biology
खगोलविज्ञान astronomy
भूविज्ञान geology
भाषाविज्ञान linguistics
मानवप्राणिविज्ञान physical anthropology
पदार्थविज्ञान physics
समाजविज्ञान sociology
संस्कृतिविज्ञान ethnology
अर्थविज्ञान economics इत्यादी

अर्थातच मानसशास्त्रऐवजी मनोविज्ञानच रूढ होऊ द्यावे, पदार्थविज्ञानशास्त्र हे जरा अतीच झाले! भूगोल, रसायन इत्यादी काही रूढ नावे तशीच ठेवावी. त्यांना शास्त्र हे पद चिकटवू नयेच.

–शास्त्र ह्या उत्तरपदाचा मग रास्त उपयोग करायला आपण मोकळे होऊ. धर्मशास्त्र इत्यादी जुने शब्द तर आहेतच. पण पुढील ज्ञानशाखांच्या नावांमध्ये शास्त्र हा शब्द योग्य दिसतो.

नगररचनाशास्त्र town planning
संगीतशास्त्र music, musicology
वैद्यकशास्त्र medical science
कृषिशास्त्र agriculture
ग्रंथपालनशास्त्र library technique
पशुपालनशास्त्र animal husbandry
संख्याशास्त्र statistics
ज्योतिषशास्त्र astrology
नागरिकशास्त्र civics
विधिशास्त्र jurisprudence
युद्धशास्त्र military science
वृत्तपत्रशास्त्र journalism
शिक्षणशास्त्र pedagogy
तर्कशास्त्र practical logic इत्यादी

सौकर्यासाठी ह्या गटातील काही ज्ञानशाखांच्या नावांपुढे शास्त्र हे पद जोडले नाही तरी चालेल. उदाहरणार्थ, आयुर्वेद, चित्रकला, वास्तुकला ( architecture ), स्थापत्य ( civil engineering ), इत्यादी.

काही ज्ञानशाखा अशा निघतील की त्यांचे स्थान ह्या दोन्ही वर्गांत निश्चित करणे अवघड आहे किंवा ह्या वर्गवारीच्या बाहेरचे आहे. उदाहरणार्थ, गणित, तत्त्वज्ञान, इतिहास. ज्या ठिकाणी विज्ञान किंवा शास्त्र हे उत्तरपद घालणे वादविषय होऊ शकेल किंवा अन्यथा गैरसोयीचे होईल त्या ठिकाणी मीमांसा किंवा त्यासारखे दुसरे पद वापरावे. उदाहरणार्थ :

साहित्यमीमांसा poetics
अर्थमीमांसा semantics
नीतिमीमांसा ethics
सत्तामीमांसा ontology
राजनीती(मीमांसा) politics
व्यूहमीमांसा formal or symbolic logic
ज्ञानमीमांसा epistemology
श्रेयविवेक axiology इत्यादी

ज्ञानशाखांना नावे देण्याविषयी आणखी काही संकेत आहेत. त्याचा उल्लेख करणे जरूर आहे.

बंगालीमध्ये तत्त्व हे उत्तरपद वापरतात. मराठीत ते पुरातत्त्व ( archaeology ), क्वचित नृतत्त्व ह्या शब्दांपलीकडे वापरण्यात आलेले दिसत नाही. -ics ह्या प्रत्ययाच्या धर्तीवर डॉ. रघुवीरांच्या अनुकरणाने इकी हा प्रत्यय वापरण्याचाही प्रयत्न झालेला आहे. सांख्यिकी, भौतिकी (physics) ही त्याची उदाहरणे. ह्यापैकी अभियांत्रिकी ( engineering ) हा शब्द कदाचित रूढ होईल. –इकी वापरायचा तर आद्याक्षरवृद्धीच्या नियमांची कटकट मागे लागते आणि जैविकीसारखे शब्द पदरात पडतात. ह्यामुळे हा संकेत मागे पडला असावा. तीच गत वानससारख्या -अ प्रत्ययान्त शब्दांची. काही लहान ज्ञानशाखांना किंवा ज्यांचा मुख्यत्वे इतर ज्ञानशाखांना साधन म्हणून उपयोग होतो त्यांच्या नावामध्ये -विद्या हे उत्तरपद वापरायला हरकत दिसत नाही. उदाहरणार्थ :

नाणकविद्या numismatics
मुद्राविद्या sphragistics
लोकश्रुतिविद्या folkloristics
पुरावशेषविद्या archaeology
पुरालेखविद्या epigraphy
पुरावाङ्मयविद्या philology
हस्ताक्षरविद्या graphology इत्यादी

ज्या ठिकाणी व्यावहारिक उपयोगाचा भाग स्पष्ट आहे त्या ठिकाणी मात्र शास्त्रच वापरावे. उदाहरणार्थ : मुद्रणशास्त्र, वृत्तपत्रशास्त्र इत्यादी. उलट ज्योतिर्विद्या न म्हणता खगोलविज्ञानच म्हणावे.

आतापर्यंतच्या विवेचनामधील एक अभावात्मक सूत्र चाणाक्ष वाचकांच्या ध्यानात आले असेलच. ते म्हणजे इंग्लिश शब्दाचे रूपविशेष logy, ics, ism इत्यादी जे आहेत, त्यांचे आंधळे अनुकरण करण्यात हशील नाही. रूपविशेषांमुळे अर्थभेदाला मदत होईल तेथे त्यांचा विचार जरूर करावा. परंतु semantics साठी सीमान्तिकी सुचवणारे लोक अभावित विनोदनिष्पत्तीखेरीज काही साधत नाहीत!

ह्या ज्ञानशाखांच्या नावांबद्दल आणखी एक वारकावा सांगून हे टिपण पुरे करतो. इतिहास, व्याकरण, भूगोल आणि अशाच काही नावाचे वैशिष्ट्य असे आहे की लक्ष्य आणि लक्षण ह्या दोहोबद्दल ती वापरता येतात. प्राणी हे लक्ष्य आणि प्राणिविज्ञान हे लक्षण, पशुपालन हे लक्ष्य आणि पशुपालनशास्त्र हे लक्षण अशी स्पष्ट व्यवस्था येथे नाही. भारताचा इतिहास घडतो आणि लिहिला देखील जातो. हीच सवय मग प्राणिविज्ञान, मनोविज्ञान वगैरे लक्षणवाचक शब्दांनाही भोवते. उदाहरणार्थ आपल्याला म्हणायचे असते मानसिक गरज, मानसिक कारणे; म्हणून जातो मानसशास्त्रीय गरज किंवा कारणे. आता मनोवैज्ञानिक उलगडा, मनोवैज्ञानिक लिखाण असा शब्दप्रयोग केला तर ते समजण्यासारखे, किंबहुना युक्तच आहे. (इंग्लिशमध्येही psychic, psychological आणि social, sociolgical आणि biotic, biological ह्या जोड्यामध्ये अशी गफलत झाल्याचे दिसून येते. अर्थात म्हणून आपणही गाफील राहावे असे नाही.) सुदैवाने मराठीत लक्ष्यदर्शक विशेषणे उपलब्ध आहेत—मानसिक, सामाजिक, भौतिक, जीवनविषयक ह्या उलट लक्षणदर्शक विशेषणे म्हणजे मनोवैज्ञानिक, समाजवैज्ञानिक, पदार्थवैज्ञानिक, जीववैज्ञानिक ही होत.

—अशोक रा. केळकर

◆ ◆ ◆

## ७ : काही ग्रंथपालनसंलग्न शब्दांची चर्चा

ग्रंथपालनावर गेल्या १०–१५ वर्षांतच विशेष विपुलतेने आणि विविधतेनेही लेखन होत आले. भाषा आणी भरपूर फैलावेल तेव्हाच शास्त्रीय आकार घेईल.

ग्रंथपालनाच्या भाषेने आत्ता आत्ताशाच आकार घेण्यास आरंभ केलेला आहे. प्रत्येक विषयाचा व त्या विषयाचा अनुभव घेत असणारांचा काही मननानंतरचा एक एक शब्द कालक्रमशः रूप घेत जातो. हे करणाऱ्या प्रत्येकाच्या बुद्धिप्रमाणांकानुसार नवे वा जुन्यांमधून नेमके ठरणारे शब्द पुढे येऊ शकतील. विपुलता, विविधता आणि नित्य व्यवहारवापर यामधून भाषा गती घेत जाते. या कामाला आता चांगलाच आरंभ झालेला आहे; यादृष्टीने पुढीलप्रमाणे काही थोडे शब्द विचारार्थ ठेवीत आहे. यातील काही शब्द अगदी नवे आहेत व अन्य सर्व रूढ शब्दांमधून उचललेले व जुळवून घेतलेले आहेत.

(१) accessioning या शब्दाला 'दाखलनोंद' हा शब्द ग्रंथपालन वर्गात गेली २२ वर्षे वापरला आहे. तो रूढ झाला आहे. अगदी प्रत्येकाला मराठी शाळेपासून 'दाखला' हा शब्द सुपरिचित असतो. प्रत्येक पुस्तकाविषयी तशाच प्रकारच्या माहितीचा सर्व तपशील या नोंदीत येतो. 'दाखल होणे' हा शब्दही सर्व परिचित आहे. तो केवळ नवाच एक शब्द घ्यावा म्हणून घेतलेला नाही. आगमनांक, क्रमांक, प्रवेशांक, संग्रहांक अशांचा विचार करून त्यांच्याहून वेगळाच हवा अशी आवश्यकता वाटून तो मनात उभा राहिला.

(२) accounts याचा अर्थ हिशोब किंवा हिशेब हा अर्थ अगणित वर्षे चालू होता व चालू राहील. ग्रंथालयात हिशेबाच्या व्यवहाराशी गेल्या शतकातील ग्रंथालयांच्या प्रारंभापासून अविरत संबंध निगडित आहे. मग लेखा हा नवा शब्द का घेतला जावा ?

(३) accounts म्हणजे 'हिशेब' लिहिण्यासाठी accountant म्हणजे हिशेबनीसच हवा आणि हिशेबनिसाने लिहिलेले हिशेब तपासण्यासाठी auditor म्हणजे हिशेबतपासनीसच असावा.

(४) bookrest किंवा booksupport यासाठी 'टेकण' हा शब्द जुन्या काळच्या समान कल्पनांमधून योजण्यास हरकत नाही. 'आधार' हा कोशार्थातला शब्द हाताळणे टाळून 'टेकण'च हाती घ्यावे.

(५) bookshelf यासाठी 'शिडी' या जुन्या काळापासूनच्या वस्तूच्या कल्पनेतून 'शिडाळे' हा शब्द नवाच बनवून पुण्याच्या वर्गसत्रात गेली वीसवर वर्षे वापरीत आहो.

(६) borrower या शब्दाच्या मूळ कल्पनेप्रमाणे याचा अर्थ वर्गणीदार, वाचक हाच आहे. borrow मधील नेमकी कल्पना येण्यासारखा शब्द हवा असेल तर आणखी पुष्कळ व्यवहार झाल्यावर अशा अर्थ छटांसाठी कदाचित् वेगळेवेगळे मराठी शब्द आपोआप येतील.

(७) call number यासाठी 'स्थानांक' हा शब्द २२ वर्षांपूर्वी ग्रंथपालन वर्गापुढे ठेवण्यात आला. इतरांनी योजलेले आवाहनांक, क्रामकांक, बोधांक, मागणी, अंक व हा 'स्थानांक' यापैकी 'स्थानांक' या शब्दानेच अगदी नेमकी कल्पना विद्यार्थ्यांना तत्क्षणी येते. हा केवळ ग्रंथपालनविषयकच शब्द आहे व तो फार महत्त्वाचा आणि नित्यच वापरावा लागणारा आहे.

(८) catalogue म्हणजे सूची हा शब्द जुन्या काळापासूनचा आहे. पण गेली काही वर्षे यासाठी 'तालिका' हा अगदी नवा शब्द पुढारलेला आहे. 'सुचवते ती सूची' ही व्याख्या गेल्या २२ वर्षांपासूनची आहे ती वाचणारास वा ऐकणारास तत्क्षणी कळते. अन्य अन्वर्थक शब्दाशी समास साधून bibliography, catalogue, index या प्रत्येक शब्दाचा अर्थ, नवाच एक चपखल शब्द तयार होऊन, साधतो. अभ्याससूची, संदर्भसूची, ग्रंथसूची, वाङ्मयसूची, लेखसूची, लेखकसूची, नामसूची,ग्रंथालयसूची, वस्तुसूची, उल्लेखसूची, विचारसूची असे अनेक सार्थ शब्द सिद्ध होतात. इंग्रजीत bibliography या शब्दाचे अभ्याससूची व ग्रंथवर्णन हे दोन भिन्न भिन्न अर्थ असूनही त्या एकाच शब्दामुळे कसलीही अडचण झालेली नाही. मराठीत सूची शब्दामागे अन्वर्थक शब्द जोडला की नव्या हव्या त्या अर्थाच्या छटेचा शब्द एकदम अवतरतो.

(९) charging and discharging यांमधील कल्पना आज फक्त 'देवघेव' या शब्दांनेच मनात उभी होईल. अगदी पद्धतशीरपणे व्यवहार होऊ लागल्यावर यातल्या मूळ कल्पना अधिकाधिक स्पष्ट होतील. तेव्हाच त्या नेमक्या शब्दांची गरजही वाटेल. आणि त्यावेळी ती नकळता भागेलही.

(१०) charging tray ला 'देवघेव खण' हा शब्द अर्थबोधक आहे.तबकात फुले, विड्याची पाने,खाद्ये, पेयांचे पेले ठेवण्यात येतात. म्हणून येथे 'तबक' निरुपयोगी आहे. 'खण' या शब्दात मात्र कामाला समान कल्पना आहे.

(११) Colon Classification म्हणजे 'कोलन वर्गीकरणपद्धती. येथे 'कोलन' हे विशेष नाम आहे. मराठीत 'कोलन' ही कल्पनाच नव्हती आणि नाहीही. 'विसर्ग' वेगळा आहे. तो हा नव्हे. 'द्विबिंदू' प्राथमिक कल्पकतेचा द्योतक वाटतो. bus, motor, table या कल्पना व शब्द यांच्या स्वीकाराप्रमाणेच colon चिन्हाचाही सरळ नावाने स्वीकार व्हावा आणि शब्दाचाही.

(१२) counter ला 'टेवल', 'देवघेव टेवल' हे प्रतिशब्द अर्थबोधक आहेत. ग्रंथालयातील काउंटरचा गल्ल्याशी संबंध नाही. देवघेवीशी आहे. म्हणून उघड्यावर देवघेव होत असेल तर 'देवघेव टेवल'. बंदिस्त असेल तर 'देवघेव खिडकी' टेवलाव्यतिरिक्त अन्य कल्पना येथे नाही.

(१३) documentation ला 'विचारसूची' हा शब्द अर्थबोधक वाटतो. अजून 'डॉक्युमेंटेशन' ही कल्पना सुस्पष्ट नि सर्वानुभूत नाही. 'विचार एकत्र करणे—मांडणे' पावेतोच आज समजुतीची मजल आहे.

(१४) elasticity आणि flexibility यामधील व्यवहारी कल्पनेप्रमाणे 'स्थितिस्थापकता, सनावेशकता, लवचिकपणा, हा अर्थ होतो. व्यवहारानुरूपच प्रतिशब्द रुळावे.

(१५) index म्हणजे 'उल्लेखसूची'. पुस्तकाच्या अखेरीस असणारी ग्रंथांतर्गत उल्लेखांची–व्यक्ती, स्थळ, घटना, काल यांची–सूची ही कल्पना स्पष्ट आहे. वाटल्यास 'निर्देशसूची' म्हणावे.

(१६) problem म्हणजे 'विवक्षा'. वर्गीकरण करताना व्यवच्छेदक लक्षणांपैकी एक म्हणून प्रॉब्लेमचाही विचार करावा लागतो. पण हा प्रॉब्लेम म्हणजे कोणत्याही अर्थाने प्रश्न, कूटप्रश्न, समस्या, वादविषय यापैकी काहीही नसते. 'सरळ नेमका मुद्दा' म्हणजेच वर्गीकरणविषयाचा 'विवक्षित विचार' हाच अर्थ असतो. हा अर्थ सुचवणारा 'विवक्षा' हा एक नवा शब्द आहे.

(१७) shelf register म्हणजे स्थानपत्रे. येथे register शब्द असला तरी नोंदवही अनुलक्षित नाही. ही पत्रेच असतात. ग्रंथालयातील सगळा संग्रह वाचकांच्या गरजेचा व कामातील सोईचा विचार करता विषयवारच ठेवणे अवश्य. पुस्तके विषयवार असताना ग्रंथमोजणी करावयाची तर ही स्थानपत्रे स्थानरचना दाखवण्याकरता व पुस्तक आहे नाही हे पडताळण्याकरताच हवी असतात. मोजणीसाठी नोंदवहीचा उपयोग नाही. 'प्रत्येक पुस्तकाचे स्थानांकदर्शक स्थानपत्र'च उपयोगी होईल. shelf register मधील register चा अर्थ पत्रे हा जमा घ्यावा लागतो तसा shelf चा अर्थ केवळ 'स्थान हाच घ्यावयाचा.

(१८) year book म्हणजे सांवत्सरिक' किंवा 'वार्षिक'. तीन तपांपूर्वी प्रा. श्री. म. माटे यांनी 'महाराष्ट्र-सांवत्सरिक' सिद्ध केले. तो शब्दच वापरला जावा.

वा. पु. कोल्हटकर

•••

# व्याकरण-परिसंवाद

## मराठीतील संयुक्त क्रियापदे

### ( २४-११-६८ रोजी झालेला व्याकरणविषयक परिसंवाद )

' शास्त्रीय मराठी व्याकरण ' कार कै. प्रि. मोरो केशव दामले यांच्या जन्मशताब्दीनिमित्त हा परिसंवाद म. सा. परिषदेने योजला होता. परिसंवादाचे अध्यक्ष होते केतकर-चरित्रकार डॉ. द. न. गोखले. उपन्यास केला प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकरांनी. त्यांचा उपन्यास-लेख पत्रिकेच्या अंकात प्रसिद्ध केला आहे.

ठरल्याप्रमाणे, शनिवार २४-११-६८ या दिवशी दुपारी चार वाजता माधवराव पटवर्धन सभागृहात परिसंवादाला सुरुवात झाली. पंचवीस ते तीस निवडक उपस्थिती होती. उपस्थितात प्रा. दे. द. वाडेकर, प्रा. श्री. ना. बनहट्टी, प्रा. य. र. आगाशे, शं. रा. दाते, डॉ. अशोक रा. केळकर, डॉ. प्र. न. जोशी, प्र. शं. जोशी, आचार्य वि. प्र. लिमये, सौ. कावेरी कर्वे, के. नारायण काळे, डॉ. मु. श्री. कानडे, गं. ना. जोगळेकर, भीमराव कुलकर्णी, यु. बा. कुलकर्णी हे प्रमुख अभ्यासक होते, प्रास्ताविकात स. शि. भावे यांनी परिसंवादाचे औचित्य सांगितले. ' मराठी व्याकरणाचा पुनर्विचार नव्या दृष्टीने होणे जरूर आहे, या परिसंवादाने अशा विचाराची सुरुवात होत आहे. अशा आणखी चर्चा घेण्याचा परिषदेचा विचार आहे,' असे सांगून त्यांनी डॉ. गोखले यांना अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंती केली. त्यांनी ती मान्य करून अध्यक्षपद स्वीकारले व नंतर प्रा. अर्जुनवाडकर यांना उपन्यास करण्यास सांगितले.

अर्जुनवाडकरांनी निबंध वाचल्यावर प्रथमच प्रश्न निघाला तो हा की, अर्जुनवाडकरांनी आढावा घेतला पण पक्ष मांडला नाही. त्यावर उत्तर मिळाले, 'प्रत्येकाने आपापली प्रतिक्रिया मांडावी. माझा पक्ष मी समारोपात स्पष्ट करीन.' ( हा समारोप ह्याच अंकात अन्यत्र आहे. )

यानंतर सलग, स्वतंत्र भूमिका मांडून चर्चेला तोंड फोडायचे म्हणून प्रा. अ. ग. मंगरूळकर हे आपले लिखित मत ( हेंही याच अंकांत अन्यत्र आहे, ) वाचणार होते. परंतु, आधी काही माहिती विचारणाऱ्या तर काही मत व्यक्त करणाऱ्या शंका विचारल्या गेल्या. उदाहरणार्थ, **डॉ. प्र. न. जोशी** : ' संयुक्त क्रियापद हा हिंदी भाषेचा अथवा व्याकरणाचा परिणाम असेल काय ? ' **डॉ. केळकर** : '*नॉमिनल कॉम्पाउंड*' ही अर्जुनवाडकरांनी उल्लेखिलेली कल्पना इंग्रजी व्याकरणाला धरून नाही. ' **प्रा. वाडेकर** : ' आंग्लपूर्व व्याकरणात संयुक्त क्रियापदांची नोंद आढळते का ? ' या व अशा शंका जरी प्रत्यक्षपणे विषयाला स्पर्श करीत नव्हत्या तरी त्यांनी चर्चेचे वातावरण हळू हळू तयार होत होते. विषयाला स्पर्श करण्यासाठी अध्यक्षांनी एक शंका विचारली.—' संयुक्त क्रियापदांची कल्पना येण्यापूर्वी या शब्दांचे व्याकरण व वाक्यांचे प्रयोग कसे सांगितले जात असत ? ' याचे उत्तर येण्यापूर्वीच, डेक्कन कॉलेजचे डॉ. कुलकर्णी यांनी सांगितले, 'ही चर्चा अनावश्यक आहे. आधुनिक भाषाशास्त्राने या कल्पनेचा विचार केला आहे. तो पूर्ण व अखेरचा आहे. ' हा विचार कोणता आहे हे डॉ. कुलकर्ण्यांनी सांगितले नाही. मात्र, 'आपण अलीकडची पुस्तके वाचत नाही आणि जुन्या झालेल्या विषयांवर उगीच नव्याने चर्चा करतो ' असा टपका मात्र, साऱ्या परिसंवादाला–दिला.

यानंतर मंगरूळकरांनी आपले टिपण वाचले. त्यांचा मुख्य-तत्त्व विचार, ' व्याकरण हे रूपविचाराचेच शास्त्र आहे ' हा, होता. संयुक्त क्रियापदांचा विचार हा अर्थानुरोधाने आलेला आहे. रूपविचारात तो येण्याचे कारण नाही. तेथे एक धातुरूप व बाकीची साधित रूपे एवढे सांगितले की व्याकरणाचा विषय संपला. असे त्यांचे प्रतिपादन हे अर्जुनवाडकरांच्या प्रतिपादनाशी जुळते असेच होते.

प्रा. प्र. शं. जोशी यांनी ' रूपविचार हाच व्याकरणाचा विषय ' या कल्पनेला विरोध केला. ते म्हणाले, ' रूप व अर्थ यांत असा पूर्ण भेद करता येणार नाही. रूप व अर्थ यांच्या परस्परावलंबित्वाचा विचार झाला पाहिजे. ' उपस्थितांपैकी बऱ्याच जणांची

यास संमती दिसली. 'अर्थविचार नाही म्हणजेच वाक्यार्थविचारही व्याकरणाचा विषय नव्हे' ही कल्पनाही बहुतेकांना टोकाची वाटली. समारोपात, 'रूपनिश्चितीसाठी अपरिहार्य तेवढाच अर्थविचार व्याकरणाने करावा', ही भूमिका अर्जुनवाडकरांनी मांडली व अर्थविचार पूर्णतया वगळला जाऊ शकणार नाही याला मान्यता दिली. पण यातच, 'अपरिहार्य तेवढाच' या शब्दसंहतीने, बऱ्याच लवचिकपणाची जोड स्वतःच्या तात्त्विक भूमिकेला दिली.

प्र. शं. जोशांनंतर डॉ. केळकर यांनी स्वतःची भूमिका सविस्तर सांगितली. त्यांचे दोन मुद्दे महत्त्वाचे होते. (१) रूप व अर्थ यांची सांगड कशी घातली जाते याचा विचार व्याकरण करते. (२) कोठल्याही व्यवस्थेत 'लाघवा' चे तत्त्व मानावे. यानुसार इतर खुलासा समर्पक असेल तर संयुक्तत्वाचे तत्त्व व्याकरणात गाळलेले चांगले होईल.

या मतावर कोणी स्वतंत्र मत व्यक्त केले नाही. चर्चा परत, 'व्याकरणाचे क्षेत्र कोणते?' या प्रश्नाकडे वळली. त्यात विचारवंतांनी आपली मते पुन्हा जोराने मांडली. शेवटी (बहुधा कंटाळून) श्री. मामासाहेब दात्यांनी **संयुक्त क्रियापदे** ही कल्पना तरी स्पष्ट करा अशी मूलभूत शंका उपस्थित केली. आचार्य लिमयांनी 'नवीन व्याकरण लिहिले जावे', अशी सूचना केली 'अशीच चर्चा **वाक्यपृथक्करण** या विषयावर व्हावी अशी सूचना डॉ. केळकरांनी केली.'

एव्हाना सात वाजायला आले होते. संयुक्त क्रियापदाबाबतीत दोन विरुद्ध भूमिका उभ्या राहिल्या होत्या. व्याकरणाचे क्षेत्र काय याविषयीही दोन पक्ष मांडून झाले होते. (एका वेगळ्या दृष्टिकोणाने, 'व्याकरण हे केवळ वर्णनात्मक असावे की त्याने आदर्शही घालावे असा प्रश्न प्रा. दे. द. वाडेकरांनी सुचविला.) म्हणून 'आज तरी, झाली इतकी चर्चा पुरे झाली', या वृत्तीने डॉ. गोखल्यांनी समारोप केला. ते म्हणाले,

'संयुक्त क्रियापदे मानावी की न मानावी या संबंधात माझे मत अजून असंदिग्धपणे ठरलेले नाही. परंतु माझा कल अभाववादी पक्षाकडे आहे. प्रत्येक भूमिका स्वीकारल्यानंतर त्या प्रत्यक्षात लावताना अडचणी येतात. अर्थानुसारी व्याकरण-व्यवस्थेत नाना विकल्पांचा पाठलाग करावा लागतो. शिवाय एका ठिकाणी संयुक्ततेचे तत्त्व स्वीकारावयाचे तर अन्यत्र का नाही तेही सांगावे लागेल. अभाववाद्यांनीही आपली भूमिका अधिक सविस्तर मांडायला हवी. या पदांचे व्याकरण स्पष्ट करण्याची जबाबदारीही त्यांच्यावरच येते. शिवाय या तत्त्वाच्या अंमलबजावणीतही काही विसंगती संभवतात. त्यांचेही निराकरण करायला हवे. (डॉ. गोखल्यांचा याविषयीचा लेख पत्रिकेत प्रसिद्ध होणार आहे.)

व्याकरणाच्या क्षेत्राविषयी एक उपयुक्त विचार गोखल्यांनी शेवटी मांडला. ते म्हणाले, 'व्याकरणशास्त्रासारख्या सामाजिक स्वरूपाच्या शास्त्रांचे क्षेत्र व त्या क्षेत्राची कक्षा अनेक वेळा रूढीनेही ठरतात, विस्तारतात, संकोचतात. हेही वैयाकरणांनी लक्षात घेतले पाहिजे.'

परिसंवाद येथे संपला. विषय मात्र संपला नाही. अशा आणखीही चर्चा झाल्या तरी तो संपणार नाहीच. कारण चर्चांनी तो पुन्हा नवाच होणार.

–स. शि. भावे

•••

## 'मराठी व्याकरणात संयुक्त क्रियापदे'

व्याकरण हे कशाचे शास्त्र आहे? भाषेच्या कोणत्या अंगाचा ते अभ्यास करते? त्याच्या अभ्यासाच्या कक्षा कोणत्या? या प्रश्नांच्या उत्तरावर संयुक्त क्रियापदांच्या प्रश्नांचे उत्तर अवलंबून आहे. शास्त्र हे प्रमाणांच्या आधाराने प्रमेयांची मांडणी करिते, हे खरे असेल, तर प्रत्येक शास्त्राची कक्षा आणि त्याला अन्य शास्त्रांपासून विभागणारी सीमारेषा ही अखेर त्या त्या शास्त्राच्या प्रमाणवर्गावर अवलंबून राहणे अपरिहार्य आहे. भाषेच्या अभ्यासात संबंध येतो रूपाचा आणि अर्थाचा. ही भाषाशास्त्रांची मुख्य प्रमाणे. या दोन्ही प्रमाणांचा निष्कर्ष समान येत असेल, तेथे अडचण येत नाही. यांचे निष्कर्ष वेगवेगळे येत असतील, तेव्हा खरी अडचण येते. 'देवाचा दूत' म्हणजे 'देवदूत'. रूप सांगते, हे दोघे वेगळे आहेत, अर्थ सांगतो, हे दोघे एकच आहेत. अशा वेळी शास्त्राला आपल्या प्रमाणांचा तरतमभाव ठरवावा लागतो. व्याकरणाच्या दृष्टीने प्रथम रूपाचा विचार, मग अर्थाचा विचार, असा तरतमभाव मानणे भाग आहे. कारण अर्थाला प्राधान्य द्यावयाचे ठरविल्यास वर उदाहरणांनी दाखविल्याप्रमाणे व्याकरणाचा आरंभच होऊ

शकणार नाही. रूप हे व्याकरणाचे प्राणप्रद तत्त्व आहे; अर्थ हे विशेषाधानहेतूतत्त्व आहे. रूपदृष्टीने ' म्हणाला ' आणि ' कोणाला ' हे शब्द एकत्र आले, म्हणजे अर्थतत्त्व पुढे येऊन त्यांना वेगवेगळ्या गटांत टाकते. या प्रक्रियेचे बारकाईने अवलोकन केल्यावर व्याकरणाचे कार्यक्षेत्र कोणते याचा उलगडा होतो. शब्दांच्या रूपांची घडण आणि या रूपांचा अन्योन्यसंबंध या दोन गोष्टींत व्याकरणाची कृतार्थता सामावलेली आहे. थोडक्यात म्हणजे ' पदापदान्वयौ व्याकरणम् '. व्याकरणाला ' पदशास्त्र ' म्हणतात, त्याची अन्वर्थकता यावरून कळून येईल.

व्याकरणाच्या या कार्यक्षेत्राचा जरासा अधिक विचार केला, म्हणजे व्याकरणातल्या अर्थतत्त्वाच्या मर्यादा स्पष्ट होत जातात. पद आणि पदान्वय यांच्या विचारात अर्थांचा संबंध प्रायः प्रत्ययांपुरताच येतो. शब्दाशब्दांमधला संबंध — म्हणजे अन्वय — प्रायः प्रत्ययांच्या द्वारा जोडला जातो; म्हणून प्रत्ययांचे अर्थ सांगणे व्याकरणाचे कामच आहे. संबंध जोडण्याचे हे काम कांही वेळा प्रत्यय अनुपस्थित असतानाही केवळ शब्दांच्या क्रमाने किंवा संनिकर्षाने सिद्ध होते; तेव्हा क्रम आणि संनिकर्ष यांचाही विचार व्याकरणाला करणे प्राप्त आहे. हे काम व्याकरण पुष्कळदा ( जसे, समासात ) प्रत्ययलोप ( म्हणजे शून्य प्रत्यय ) सांगून करते; कारण अशा स्थळी प्रत्यय प्रत्यक्ष उपस्थित नसला, तरी त्याचा अर्थ उपस्थित असतो, आणि कार्यावरून कारणाचे अनुमान होते. या सगळ्याचा विचार करिता व्याकरणाला स्थूल मानाने भाषेचे ' प्रत्ययशास्त्र ' म्हणावयास हरकत नाही. व्याकरण प्रत्ययांचा विचार करते; प्रकृत्यर्थांचा विचार ते त्यांमुळे प्रत्ययांवर परिणाम होत असेल, तेव्हाच करते. भुज्–धातूच्या अर्थाचा विचार पाणिनीला करावा लागला, तो त्यामुळे. त्या धातूला आत्मनेपदी प्रत्यय लागावयाचे की परस्मैपदी, हे ठरू लागले म्हणून. एरवी व्याकरण प्रकृत्यर्थ गृहीत करते. प्रकृतीला अर्थ असणे एवढी गोष्ट व्याकरणकार्याला पुरेशी आहे. तो अर्थ कोणता, याची उसाभर व्याकरण करीत नाही. म्हणूनच प्रकृत्यर्थांच्या ( जसे, ' सूर्य काळा आहे ' या वाक्यातल्या ) विसंगतीने व्याकरणाला दुःख होत नाही. 'भद्रस्य कट्यां सरटः प्रविष्टः' हे नैयायिकाला न चालणारे वाक्य वैयाकरणाला चालते, ते यामुळेच. ' प्रकृत्यर्थ कळला नाही, तर प्रत्यय कोणता जोडावयाचा ते कसे कळणार ?' हा प्रश्न व्याकरणाला अडचणीत टाकू शकत नाही; कारण भाषा शिकविण्यासाठी व्याकरणाचा जन्मच झालेला नाही, आणि व्याकरणशास्त्राच्या अभ्यासाशिवायही भाषा उत्तम येऊ शकते.

व्याकरणाच्या कार्यक्षेत्राविषयी, मर्यादांविषयी एकदा कल्पना स्वच्छ झाली, की संयुक्त क्रियापदांच्या प्रश्नाची उकल अनायासाने होते. संयुक्त क्रियापदाचा प्रश्न उद्देश्य–विधेयात्मक वाक्यविचाराचे अंग, म्हणजे ' फ्रेझ, क्लॉज ' अशा स्वरूपाचे, असेल, तर त्याचा संबंध व्याकरणाशी नाही, कारण असा वाक्यविचार व्याकरणाच्या कार्यकक्षेत येत नाही. पदान्वय या स्वरूपाचा वाक्यविचार व्याकरणाच्या कक्षेत येतो; त्या पक्षी संयुक्त क्रियापद मानण्याचीच आवश्यकता राहात नाही. पदान्वयात्मक संयोग वाक्यात अन्यही पदांचे असतात, त्यात क्रियापदांच्याच अशा संयोगांना खास स्थान देण्याची काय आवश्यकता आहे ? 'घटकांच्या अर्थांहून समुच्चित अर्थ वेगळा येतो, तो लाक्षणिक वगैरे असतो, हे कारण असेल तर, ते व्याकरणाच्या विचाराबाहेरचे आहे; कारण प्रत्ययावर परिणाम होत नसेल, तर प्रकृतीच्या वाच्यार्थाचासुद्धा विचार व्याकरण करीत नाही, मग लक्ष्यार्थ दूरच राहिला. संयुक्त क्रियापदे मानणारे लोकसुद्धा त्यांतल्या घटकपदांचे अस्तित्व मान्य करितातच; – आणि ते मान्य केलेच पाहिजे, कारण त्यांना चरम प्रत्यय लागलेले असतात आणि अन्य पदांचे व्यवधानही चालते. हे घटकपदांचे पदत्व एकदा मान्य केल्यावर त्यांचा अन्वय सांगण्यापलीकडे व्याकरणाला कामच उरत नाही.

कृ. श्री. अर्जुनवाडकर

◆ ◆ ◆

## मराठीतील संयुक्त क्रियापदे

बोलण्यात असलेली एखादी जिवंत भाषा आणि तिचे यथावत स्वरूप सांगणारे वर्णनात्मक व्याकरण ही कधीकाळी सर्वथैव समव्याप्त होतील, हा संभव अशक्यप्राय आहे. व्याकरणाचे पांघरूण अशा भाषेच्या सर्वच्या-सर्व अंगप्रत्यंगांना झाकू शकेल किंवा नाही, हे सांगता येणार नाही. कारण अशा भाषेमध्ये रोजच्या-रोज काही-ना कांही नवीन प्रयोग, रूपे, रचना या कोठून-कोठून वाहत येत

असतात; आणि त्यांचा समावेश व्याकरणाच्या नियमांत करण्यासाठी दुरुस्त्या-पुरुस्त्या जोडाव्या लागतात. कालांतराने काही रूढ रूपे, प्रयोग ही उच्छिन्न होऊन जातात, तेव्हा त्यांची केलेली व्यवस्थाही रद्दबातल करावी लागते. ' शिवाजीसी चढे घोडियानिशी पकडून आणूं ' या बखरीतल्या वाक्यातील अधोरेखित रूपांची दखल घेण्याचे आजच्या मराठी भाषेचे वर्णनात्मक व्याकरण लिहिणाऱ्याला प्रयोजन नाही. मात्र नामांच्या तृतीयेच्या एकवचनाचा प्रत्यय आजच्या बोलभाषेत ' ने ' नसून ' नें ' आहे, हे त्याला नोंदवावे लागेल. ( ' ने ' हा लिखित- मुद्रित स्वरूपात आढळतो. ) तसेच, १. अनुकृष्ट ( ओढलेला ) अ-कारान्त ' न '. कधीकधी हा ' ने '-प्रत्यय ' नें ' असा ढळढळीत नासिक्योच्चारयुक्त ( कै. शेजवलकरांच्या भाषेतल्याप्रमाणे ) असतो, हेही त्याला ध्यानी बाळगावे लागेल. हे लक्षात घेता बोलण्यातल्या प्रमाणमराठी भाषेच्या वर्णनात्मक व्याकरणाची व्याप्ती ध्यानात येईल.

तथापि हा विषय सोडून दिला, तरी भाषेमधल्या एखाद्या विशिष्ट घटनेची सूत्रबद्ध आणि एकजिनसी मांडणी करणे हे व्याकरणाचे प्रयोजन आहे, हे उघड आहे. हे प्रयोजन साध्य करिताना काही गृहीते आपल्याला स्वीकारावी लागतात. ही गृहीते जितकी कमीत-कमी घ्यावी लागतील, तितके त्या व्याकरणात लाघव येते. लाघव हे मान्य तत्त्व आहे. तसेच, ही गृहीते एकदा स्वीकारल्यावर ती परस्परांशी सुसंगत असणे हेही आवश्यक असते. या दृष्टीने पाहता कोणतेही व्याकरण हा एक बुद्धिबळाचा डाव असतो. बुद्धिबळातही भिन्नभिन्न देशांतील म्हणून भिन्नभिन्न गृहीते असतातच. जसे : जोराजोरीच्या खेळाचे गृहीत, मारामारीच्या खेळाचे गृहीत, इत्यादी. शिवाय वेगवेगळया मोहऱ्यांच्या वेगवेगळ्या चालींची पोटगृहीते असतात; जसे : घोड्याची अडीच घरे, हत्तीची सरळ चाल इत्यादी. या उभयविध गृहीतांच्या स्वीकृतीवर डाव चालू होतो. तो चालू झाल्यावर छोटे-छोटे डावांतर्गत डाव अनेक असतात. जसे हुचमळी, वजिरी, प्यादी इत्यादी.

या दृष्टीने पाहता मराठीत ज्यांना ' संयुक्त क्रियापदे ' म्हणतात, त्यांच्या प्रश्नाचा उलगडा कोणत्या गृहीताला अनुसरून कसा करता येईल, हे पाहावयाचे आहे. व्याकरण हे रूपविमर्शात्मक शास्त्र आहे. अर्थविमर्शाचा प्रश्न त्यात नाही. रूपभेदासाठी अपरिहार्य असणाऱ्या किमान अर्थापलीकडे तो नाही. तसेच, शब्दाचे एकच रूप ज्या वेळी अनेक कार्ये करते, त्या वेळी रूपविचार हा कार्यानुसारी ( functional ) ठरतो. उदाहरणार्थ, विशेषण हे जेव्हा नाम म्हणून भाषेमध्ये योजिले जाते तेव्हाही त्याला विशेषणच म्हणत राहणे याने विसंगती उत्पन्न होते. जसे: ' आंधळ्याला पैसा दे भगवान ' यात ' आंधळ्याला ' हे विशेषण नसून नाम आहे. ' आनंदाने गा ' यात ' आनंदाने ' हे नाम नसून क्रियाविशेषणरूप आहे. ' ती चांगली पोहते ' ' चांगली हे रूपतः विशेषण, तर ' ती चांगले पोहते ' यात ' चांगले ' हे क्रियाविशेषण. ' शास्त्रात धरसोड करू नकोस ' यात ' धरसोड ' हे नाम, आणि ' करू ' याचे कर्म आहे. ' जातो-जातो करू नकोस ' यातही ' जातो-जातो ' हे ' धरसोड ' याप्रमाणे नाम. ' मज्जाव केला यातही ' मज्जाव ' हे नाम आणि ' केला ' याचे कर्म आहे. अशा वाक्यांत शब्दाची घडण फोडून ( जसे: ' धर '-' सोड ' ' मत '-' जाव ' इत्यादी.) त्यांच्या व्युत्पत्तींत डोकावण्याचे व्याकरणाला कारण नाही. व्युत्पत्तिवाद, अर्थविमर्शवाद हे व्याकरणाला अनावश्यक आहेत.

' संयुक्त क्रियापद ' यातील ' क्रियापद ही संज्ञा अमान्य वा आक्षेपार्ह नाही. परंतु ' संयुक्त ' असे म्हटल्याने क्रियापदाचा कोणता विशेष पृथक्‌पणे दाखविला जातो यावर ' संयुक्त क्रियापदा 'च्या मांडणीचा प्रश्न अवलंबून राहतो. ' संयुक्त क्रियापद ' म्हटल्याने **अनेक क्रियापदांचा संयोग** दाखवावयाचा आहे काय ? — नाही. त्यातले क्रियापद वस्तुतः एकच असते. उरलेली धातुसाधिते असतात, कधी-कधी विशेषणे असतात; इत्यादी. ' त्याने मला जाऊ दिले ' यात ' जाऊ दिले ' हे संयुक्त क्रियापद मानिले जाते, आणि धातू ' जा '. तथापि ' जाऊ ' हे अव्ययच आहे. त्याच्या ठिकाणी क्रियापदाचा धर्म नाही, ही वस्तुस्थिती आहे. ' लिहून चुकणे ', ' मारीत सुटणे ' इत्यादीही स्थळी हीच स्थिती आहे. म्हणजे संयुक्त क्रियापदाचा जो धातू म्हणून सांगितला जातो, त्याचा क्रियापद असण्याशी काहीच संबंध नाही. क्रियापद जरी संयुक्त मानले, तरी धातू मात्र संयुक्त नाही. तात्पर्य, धातू एक, क्रियापद दुसरे, अशी विसंगती निर्माण होते.

प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकरांनी या संदर्भात अनेक पक्ष आपल्या एतद्विषयक लेखात दिलेले आहेत. (पहा म. सा. पत्रिका : वर्ष ४३, अंक १६६: जुलै-सप्टेंबर १९६८ :

पृ.३६.) त्यांनी जरी विस्तारवादी, संक्षेपवादी, अतिसंक्षेपवादी आणि अभाववादी असे चार पक्ष निवडून दिलेले असले, तरी त्यांतले पहिले तीन परस्परसंक्रान्त (Overlapping) होतात, असे दिसेल. वस्तुतः; त्यांत दोनच, पक्ष आहेतः एक पक्ष संयुक्त क्रियापद नावाचा क्रियापदांचा प्रकार मानणाऱ्यांचा आणि दुसरा पक्ष तसा प्रकार न मानणाऱ्यांचा. म्हणजे एक अस्तिवादी आणि दुसरा नास्तिवादी.

याविषयी विचार करिताना संस्कृत, इंग्रजी इत्यादी भाषांच्या व्याकरणांचा निर्वाळा मराठीच्या व्याकरणात्मक निष्कर्षाला गैरलागू आहे. कोणत्याही भाषेतील संवादी उदाहरण घेण्याला आक्षेप असण्याचे कारण नाही. (जसे : गन्तुं ददाति, कुर्वन् आस्ते, इत्यादी.) तशी ज्ञानदेवीतही म्हणजे यादवकालीन मराठीतही १२-९७, १२-१०५ इत्यादी स्थळी संयुक्त क्रियापदांची मोडणी आढळते. परंतु आजच्या मराठीचा विचार आणि निर्णय हा मराठीच्या आजच्या उदाहरणांना अनुसरून व्हावयाला पाहिजे. संस्कृत वैयाकरणांनाही प्राचीन काळी अनेक भाषा आणि त्यांची व्याकरणे कदाचित अवगत असतील. परंतु त्यांचे व्याकरणशास्त्रातील निष्कर्ष मात्र केवळ संस्कृत भाषेतील रूपांवर आणि हवाल्यांवरच अवलंबून होते.

हे ध्यानी घेता 'क्षालयांचकार', 'पयोधरीभवति' इत्यादी रूपांचा किंवा इंग्रजीमधील सदृश उदाहरणांचा निष्कर्षदृष्ट्या उपयोग नाही. शिवाय, 'क्षालयांचकार' यांसारखी पदेही अखंड आहेत, सखंड नाहीत. तसेच, अशा आम्-युक्त रूपांच्या वैकल्पिक प्रयोगांत अर्थतः काहीही फरक नसतो. त्यांत एकाऐवजी दुसरे रूप सुखाने नांदू शकते. 'जजागार' आणि 'जागरांचकार' ही क्रियापदे रूपतः भिन्न असली, तरी अर्थतः एकच आहेत. त्यात एकाऐवजी दुसरे रूप येऊ शकते. त्यांतील धातूही एकच ('जागृ' हा) आहे. पण मराठीतल्या संयुक्त क्रियापदांची गोष्ट वेगळी आहे.

'मराठीच्या व्याकरणात संयुक्त क्रियापदांचा प्रश्न हा एक वादग्रस्त प्रश्न होऊन राहिला आहे.' हेच वाक्य पहा ना. या वाक्यात 'प्रश्न' हे उद्देश्य आहे. आता,त्याविषयीची क्रिया कोणत्या क्रियापदाने सांगितली आहे? 'होऊन' याने? की 'राहिला' याने? की आहे याने? की 'होऊन राहिला आहे' याने? यांतल्या प्रत्येक पदाचा अर्थ हा त्या पदांच्या समुच्चित अर्थाहून वेगळा तर आहेच, पण त्यांतल्या एकेका पदाने दुसऱ्या पदाच्या अर्थात थोडी-थोडी भर टाकली आहे. आणि 'प्रश्न' या उद्देश्याचे विधान तीन वेगवेगळया क्रियावाचक पदांनी केलेले आहे. तेव्हा हे संयुक्त क्रियापद मानावे, असा या विषयात पक्ष आहे.तात्पर्य, ज्या वाक्यात क्रिया ही एकाहून अधिक धातूंनी व्यक्त होते, त्या वाक्यात क्रियापद हे संयुक्त क्रियापद मानावे, असे या पक्षाचे स्वरूप ठरते.

'संयुक्त क्रियापद' ही संज्ञा चमत्कारिक आहे. तीत क्रियापदांचा विशिष्ट समास आहे असे नाही. तिने क्रियापदांचा निवळ संयोगही दर्शविला जात नाही. तर ज्या पदांनी क्रिया उक्त होते, त्या पदांच्या अर्थांची उत्तरोत्तर वाढ होते, किंवा त्यांचा समुच्चय सांगितला जातो. होऊन राहिला आहे = होऊन + राहिला + आहे. वस्तुतः, यांतल्या कोणत्याही व्यस्त पदाने समुच्चित अशा तीन पदांचा अर्थ व्यक्त होत नाही. एवढेच नव्हे, 'होऊन'च्या अर्थाची वाढ 'राहिला आहे' याने झाली, असेही नाही. किंवा 'राहिला' याची वाढ 'आहे' याने झाली, असेही नाही. फार काय, अर्थतः पाहता 'होऊन राहिला आहे' हा एक नवाच अर्थ बनला आहे. बरे, 'होऊन', 'राहिला' आणि 'आहे' यांतील 'होऊन' हे पूर्वकालवाचक, 'राहिला' हें भूतकालवाचक आणि 'आहे' हे वर्तमानकालवाचक पद आहे. अशा ठिकाणी भिन्नभिन्न कालांचा योग व्याकरणसंबंधाच्या दृष्टीने कसा घालणार, असाही प्रश्न आहे. सारांश येथे, 'होऊन राहिला आहे' या वाक्यांशाच्या अर्थाची चर्चा करण्याचे काम व्याकरणावर येऊन पडते, आणि अशा अर्थचर्चेनंतर व्याकरणाचा निर्णय अपेक्षित आहे.

आता, अर्थाच्या चर्चेची असली जबाबदारी खरोखर व्याकरणाला घेता येणार नाही. कारण त्यायोगे व्याकरण हे अर्थावलंबी होऊन त्याचा काव्यशास्त्र,न्यायशास्त्र,अर्थविमर्शशास्त्र इत्यादी शास्त्रांशी छेद जाऊन त्याची एकविधता संकुल झाल्यावाचून राहणार नाही. व्याकरण हे शब्दरूपांच्या रचनेची जबाबदारी घेईल, अथवा घेऊ शकेल. पण अर्थाची जबाबदारी ते घेऊ लागले, तर इतर शास्त्रांच्या गुंतागुंतीच्या आडवाटेने त्याला धावावे लागेल, आणि ते अर्थाच्या गुंतावळयात अडकून मात्र पडेल. फार तर

त्याला मराठीत हरघडी येत असलेल्या अशा प्रकारच्या तथाकथित संयुक्त क्रियापदांच्या याद्याच्या-याद्या देत बसावे लागेल. यापलीकडे त्यात लाभ नाही. गणित सोडविण्याची ज्या मुलाला कुवत नाही, त्याला शून्यलब्धीची गणिते घालण्यासारखे हे होणार आहे.

शिवाय असे की, संयुक्त क्रियापदांच्या अशा याद्या देताना त्यातून काही निष्पन्न व्हावयास पाहिजे. नाहून, ते निरर्थक ठरणार. आणि दुसरे, त्यात मूळ धातू कोणता? क्रियापद जर 'होऊन राहिला आहे' असे संयुक्त असेल, तर धातू 'हो-राह-अस' असा संयुक्त मानावा लागेल. 'खाऊन टाक' यात धातू कोणता? 'खा-टाक' हा? 'मारीत सुटत बसणे' यात धातू कोणता? 'मार-सूट-बस' हा? क्रियापद अनेक क्रियांनी संयुक्त असे मानावयाचे, आणि धातू मात्र क्रियापदांच्या अर्थाकडे लक्ष देऊन एकच सांगावयाचा, आणि वाक्यातील त्या धातूचे प्रयोगात जे रूप व्हावयाचे, तेही आणखी दुसऱ्याच एखाद्या धातूचे व्हावयाचे, अशा प्रकारे 'पांडव किती?' याच्या उत्तराप्रमाणे बाचेने दोन, बोटांनी तीन, उपमेने चार – असे सांगितल्याप्रमाणे होणार आहे.

प्रा. अर्जुनवाडकरांनी जी नमुन्याची म्हणून काही संयुक्त क्रियापदांची वाक्ये आपल्या लेखाच्या शेवटी दिलेली आहेत (पूर्वोक्त: ३९), त्यांतल्या काहींत संयुक्त क्रियापदांचा प्रश्न रूढ अर्थानेही उत्पन्न होत नाही. उदाहरणार्थ, 'अर्जुन बोलता झाला' यात 'बोलता' हे उघडच विशेषण आहे. 'शिपायाकडून चोर धरला जातो' यातही संयुक्त क्रियापदाने विशेषणाचे रूप घेतले आहे. 'त्याने श्लोक पाठ म्हटले' यात '-पाठ' हे क्रियाविशेषण, इत्यादी.

तात्पर्य, संयुक्त क्रियापद मानण्याची अपरिहार्यता मराठीत नाही. अनेक विधेयांचे प्रपंच ज्यांनी होतात, त्या धातुसाधितांची गणना आपण संयुक्त क्रियापद म्हणून करितो. त्यात अर्थाचा व्याकरणबाह्य प्रश्न आपण निरपेक्षतेने आणतो, आणि प्रश्न विनाकारण गुंतागुंतीचा करून ठेवतो. 'गुंतागुंतीचा' या अर्थाने की, आपण त्या वेळी व्याकरणबाह्य शास्त्रांचा पाठपुरावा करू लागतो. म्हणून माझ्या मते संयुक्त क्रियापदांची रूढ कल्पना मराठीच्या व्याकरणात अकिंचित्कर आहे. यासाठी मला जर कोणी 'तुम्ही संयुक्त क्रियापदे मानता की नाही?' असा प्रश्न विचारला, तर मी त्याला वरवर विसंगत वाटणारे असे उत्तर देईन की, 'मी व्याकरणात अर्थविमर्श आणीत नाही!'

**अरविंद मंगरूळकर**

◆ ◆ ◆

## म. सा. महामंडळाच्या लेखनविषयक नियमांबाबत

म. सा. महामंडळाने ठरविलेल्या लेखनविषयक नियमांच्या अंमलबजावणीत ज्यांना ज्यांना अडचणी येत असतील व उणिवा आढळत असतील त्या परिषदेच्या चिटणिसांकडे कळविण्याबाबत यापूर्वी म. सा. पत्रिकेतर्फे आवाहन करण्यात आले होते. त्यास अनुसरून अनेक व्यक्तींनी आपल्या अडचणी कळविल्या. या अडचणींचा विचार करून आपला अहवाल सादर करण्यासाठी म. सा. महामंडळाने वर्धा येथील साहित्य संमेलन प्रसंगी एक समिती नेमली असून त्यांचा विचार सदर समितीच्या बैठकांतून क्रमशः होणार आहे. अद्यापही ज्यांना आपल्या अडचणी व शंका मांडावयाच्या असतील त्यांनी त्या श्री. मो. रा. वाळंबे, चिटणीस, म. सा. परिषद, टिळक रस्ता, पुणे २ या पत्त्यावर फेब्रुवारी-अखेरपर्यंत लेखी पाठवाव्या ही विनंती.

# सारसंकलन

## वर्धा येथील ४८ व्या मराठी साहित्य संमेलनातील प्रा. पु. शि. रेगे यांचे भाषण*

......

गेल्या वर्षभरात या ना त्या निमित्ताने मला भारतातील काही वेगवेगळ्या भागात जाण्याचा प्रसंग आला. भोपाळ, दिल्ली, अजमेर, उदेपूर, जयपूर ही महाराष्ट्राबाहेरची स्थाने आणि औरंगाबाद आणि नांदेड ही महाराष्ट्रातील स्थाने येथे मी जाऊन आलो. नुकताच पुण्यालाही सत्काराच्या निमित्ताने जाऊन आलो. साहित्यासंबंधीची एक खास मराठी आस्था महाराष्ट्रात आणि मराठी समाज जिकडे जिकडे या भारतात विखुरलेला आहे तिकडे तिकडे मला दिसून आली. विशेषतः तरुण वर्गात आपण पुष्कळ काही तरी नवीन करावे, अशा प्रकारची एक भावना आढळून आली. मराठीतर समाजामध्ये ही भावना थोडी अधिक प्रकर्षाने आढळली. परंतु सर्वत्र एक गोष्ट जाणवली ती ही की ही आस्था, ही जाणीव, ज्या पद्धतीने आजच्या या काळात सफल करण्यासाठी संघटित प्रयत्न करणे अवश्य आहे—त्या प्रयत्नांची एक दिशा तरी गवसलेली नाही किंवा त्यासाठी लागणारी साधने तरी हवी तशी उपलब्ध होत नाहीत. त्यामुळे एक विफलतेची आणि कदाचित या विफलतेतून उद्भवणारी एक प्रकारची धाष्टर्याची—थोडीशी दाखवेगिरीची ( exhibitionism ) कळा त्यांच्या प्रयत्नांवर दिसून येते. या विफलतेचे रूप स्थलपरत्वे आणि परिस्थितीला अनुसरून वेगळे असते इतकेच.

महाराष्ट्राबाहेरील मराठी समाजाच्या व्यथा ज्या मला जाणवल्या त्यांचा मी प्रथम निर्देश करतो. हा समाज आपली भाषा व संस्कृती टिकविण्याचा सर्वत्र आपापल्या परीने प्रयत्न करीत आहे. हा प्रयत्न सध्याच्या भाषावार राज्यांच्या जमान्यात फारसा सफळ होईल असे निदान आजतरी दिसत नाही. मराठी प्राथमिक शाळा, माध्यमिक शाळांतून मराठी शिकविण्याची व्यवस्था, विद्यापीठात जेथे मराठी भाषिक विद्यार्थी जास्त संख्येने आहेत तेथे मराठीच्या उच्च शिक्षणाची सोय — किमानपक्षी अशा विद्यार्थ्यांना महाराष्ट्रात येऊन शिकण्याची काही सोय व सवलती, इत्यादी आज आवश्यक झाल्या आहेत. त्यासाठी संघटित प्रयत्नांची आवश्यकता आहे. हे काम त्या त्या राज्यातील शासनाकडून गोडीगुलाबीने राहून व वागून थोडेबहुत होऊही शकेल. पण त्याचबरोबर महाराष्ट्रातून या अशा प्रयत्नांना योग्य ती साथ, साहाय्य व दिलासा मिळणे अत्यंत आवश्यक आहे. ' आम्हांला इकडे तुम्ही कुणी विचारतच नाही ' अशी जी तक्रार या भागात केली जाते तिची अगत्याने दखल घेतली पाहिजे. ... शिक्षणाच्या मागोमाग साहित्यही आले. भोपाळला आणि अजमेरलाही ज्या चर्चा झाल्या त्यात एक सूर होता की तिकडच्या साहित्यिकांच्या लेखनाची महाराष्ट्रातील नियतकालिकात आबाळ होते. काहींचे तर असेही म्हणणे पडले की, आम्हाला मुद्दामच वगळण्यात येते. आता हे जरी तितकेसे खरे नसले तरी त्यात थोडे तथ्य आहे. ... पण त्याचबरोबर एका व्यापक दृष्टीचा अवलंब करून अशा प्रकारची तक्रार सहसा उद्भवणार नाही अशी आपण दक्षता घेतली पाहिजे.

भिन्न परिसरातील लेखकांनीही एक साहित्यिक पथ्य पाळणे अवश्य आहे, हेही या संबंधात नमूद केले पाहिजे. त्यांनी केवळ महाराष्ट्रातील लेखनाच्या नकला करण्याचा प्रयत्न करू नये. ज्या भूमीत आपण राहतो, वावरतो, त्या भूमीचे वैशिष्ट्य आत्मसात करून एक आगळे मराठीपण उभे करण्याचा त्यांनी ध्यास घेतला पाहिजे. मराठी-भाषा आणि साहित्य दोन्ही त्यामुळे अधिक समृद्ध होतील. पूर्वी निजामाच्या राजवटीतील वी. रघुनाथ यांनी जे केले आणि आज हैद्राबादेतील ए. वि. जोशी जे करीत आहेत, किंवा पूर्वी माळव्यातील भालचंद्र लोवलेकरांनी जे केले आणि आज धारवाडचे जी. ए. कुळकर्णी जे करीत आहेत त्याचा आदर्श या लेखकांनी पुढे ठेवला पाहिजे. अजमेरात राहून शिवाजीपार्की किंवा

* संक्षिप्त स्वरूपात

सातारी गोष्ट लिहून भागणार नाही. ती अजमेरची, तिच्या परिसराची गोष्ट झाली पाहिजे. तिकडच्या भूमीत रुजून, बहरलेली गोष्ट झाली पाहिजे. हे असले जिवंत लिखाण मग सर्वांनाच हवेहवेसे होईल.

दुसऱ्या प्रकारची विफलता जी मी मघा सांगितली– जिचे एक प्रकारच्या धाष्टर्यात आणि दाखवेखोरीत परावर्तन होते—तीही जाता जाता विचारात घेतली पाहिजे. हिचे स्वरूप तसे स्थलबद्ध नाही. ही सर्वत्रच कमी-अधिक प्रमाणात दिसून येते. हिच्यातून जे साहित्य ( किंवा कला ) निर्माण होते ती सर्वस्वीच Pose असते असे मला म्हणायचे नाही. त्यातील काही जीवनाच्या प्रामाणिक जाणिवा बरोबर घेऊन येते. परंतु त्यात जी साहित्याच्या मूळ धारणेबाबत एक वेगळी दृष्टी आढळते तिचा थोडा अधिक विचार करणे प्राप्त आहे.

............

या आविष्कारातील कवितेसंबंधाने मी थोडे अधिक बोलणार आहे. यातील काही कविता, काव्याला मानणारी अशी जी दोन-तीन नियतकालिके महाराष्ट्रात आहेत ती, कसोशीने व उत्साहाने छापतात. परंतु पुष्कळशी कविता याच कवितांना वाहिलेल्या छोट्या छोट्या नियतकालिकांतून ( काहींचा त्यांना अनियतकालिक असे म्हणण्याचा आग्रह असतो ), क्वचित स्वतंत्र छोट्या पुस्तिकांतून प्रसिद्ध होत असते. माझ्यावरील या वेगवेगळ्या गटांतील लेखकांच्या लोभामुळे मला ती विनासायास वाचायलाही मिळते. ही कविता वाचल्यानंतर बरेच वेळा मला वाटते की यांपैकी पुष्कळांनी––जर त्यांच्या कवितेला योग्य प्रसिद्धी मिळाली तर––हे असे लिहिले नसते. हा बराचसा एक प्रकारचा protest आहे. त्यात भावनांचा उद्रेक असतो पण त्याहून अधिक एक उसना आक्रस्ताळेपणा असतो. संकुचित वैयक्तिक विफलतेतून हे पुष्कळसे काव्य आकार घेत असते. त्यातही या आक्रस्ताळेपणाचे–– कदाचित एकमेकांच्या अनुकरणाने, प्रभावाने—काही साचेही बनलेले आढळून येतात. आणि या सर्व प्रकारामुळे, मी मघा सांगितल्याप्रमाणे, ते जीवनाच्या मूळ धारणेप्रत पोचू शकत नाही, आपणाला नेऊ शकत नाही. यातील बरीचशी विफलता जर प्रसिद्धीच्या काही योजना आपण या उमद्या लेखकांना उपलब्ध करून दिल्या तर सार्थकी लागेल असे मला अलीकडे वाटू लागले आहे.

............

जे प्रतिष्ठित झाले आहे त्याचा पाठपुरावा करणे सोपे असते. जे प्रायोगिक आहे त्यासंबंधीही आपल्या काही जबाबदाऱ्या आहेत. साहित्यसंस्थांनी हे समजून वागण्याची आता वेळ आली आहे असे निदान तरी मला वाटते.

............

दुसरा जो ठळक विशेष मला सांगावयाचा आहे तो हा की आपण आज सर्वच प्रायः साहित्याची व्याख्या आत्मनेपदी करण्याच्या खटाटोपात आहोत. आजच्या कथांत, कवितांत, कादंबऱ्यांत आत्माविष्कार अधिकाधिक होत आहे. ही एक प्रकारची साहित्याच्या प्रगतिशीलतेची खूण आहे असे सांगत सांगत आपण आत्माविष्काराची व्याख्या आणि साहित्याच्या कक्षा अकारण सीमित करीत आहोत. साहित्यात किंवा कलेत खरा आत्माविष्कार केव्हा होतो जेव्हा त्यात साहित्यकाराचे किंवा कलाकाराचे 'स्व'त्व लोप पावलेले असते. जेव्हा आस्वादक आणि त्याच्याकरवी सर्व विश्वच तेथे साक्षीरूपाने वावरू लागते. भावार्थदीपिकेत ज्ञानदेव नसतात, आपण असतो, वेगळे झालेले आपण असतो. हॅम्लेटमध्ये शेक्सपीयर नसतो, आपल्या स्वतःच्याच गूढ प्रेरणा जागत असतात. खरा आत्माविष्कार तो हा. आत्माविष्कार म्हणजे केवळ स्वतःच्या भावनांचा किंवा जाणिवांचा अविष्कार अशी सोपी व्याख्या करून भागणार नाही. जिथे 'स्व' नाही आणि तरीही आहे, आणि जिथे 'स्व' आहे आणि तरीही नाही–अशा एका अलौकिक पातळीवर हा साहित्यातील किंवा कलेतील आत्माविष्कार होत असतो. या अशा आत्माविष्काराशिवाय खरी निर्मिती होऊच शकत नाही. आत्माविष्काराची एक संकुचित कल्पना करून घेऊन आपण तिला अभिप्रेत असलेल्या साहित्याला निष्कारण अवास्तव महत्त्व देतो असे मला वाटते.

यातूनच मग आपणाला साहित्याचे खरे गमक काय याचा शोध घेता येईल, आपली श्रेयस्थाने निवडता येतील. आपले वाचन बहुविध हेतूंनी होत असते. आपणाला माहिती हवी असते. काय, कुठे घडत आहे ते जाणून घ्यायची जिज्ञासा असते. एखादा विषय समजून घ्यायचा असतो. वेळ घालविण्यासाठी, मनाला थोडा विरंगुळा पाहिजे म्हणून आपण वाचीत असतो. हे सर्व व्यापक

अर्थाने ' साहित्य ' या सदरात आपण घालीतच असतो. पण साहित्याची खरी व्याख्या या सगळ्या वाचनीय वस्तूंच्या कुठेतरी पलीकडे घोटाळा असते. वृत्तपत्रातील एखादी भयानक घटना, चंद्रावरील भ्रमणाची शास्त्रीय चिकित्सा, रहस्यकथेतील आलंबन ( suspense ) तो–ती–आणि–एक–कुणी यांचा त्रिकोण—हे सर्वच आपणाला वेगवेगळ्या कारणांसाठी हवे असते. मग उरते ते काय ? मला वाटते उरते ते आपणाला स्वतःला जाणवून घेण्याची एक निगूढ प्रवृत्ती. आपण काही तरी अधिक शोधत असतो. हे जे ' अधिक ' त्याचे जेथे किंचित दर्शन होते तेथे साहित्याचा स्पर्श झालेला असतो.

............

हे दर्शनही तसे एकात्म नसते. ते तुटपुटते असते हे तर खरेच, पण त्याहूनही अधिक ते बदलते असते. वेगवेगळ्या अंगांनी सतत वाढणारे असते. आपणाला ते वेगवेगळ्या संभावनांची (possibilities ) ची जाणीव करून देते. या अशा प्रकारच्या साहित्याचा हाच एक प्रमुख विशेष असतो. ते थांबत नाही, स्थिरवृत्त नसते. याचाच आणखी एक अर्थ असा की प्रत्येक वेळी ते एक नवे रूप घेऊन येते, एक नवा न्याय साधते. ही प्रभूतता ज्या साहित्यकृतीत अधिक ते साहित्य अलौकिक अर्थाने टिकते. वेगवेगळ्या रूपांनी स्थलकालनिबद्ध व्यक्तींना ती आपल्या वेगवेगळ्या रूपांनी विंधून एक सतत संवाद साधत राहते. अशा या कृतीला तसे पाहिले तर रूढ पद्धतीने दाखविता येईल असा ' अर्थ ' नसतो. तो अर्थ तिला प्रत्येकाने आपल्या संदर्भात द्यायचा असतो, तो संपत नसतो, आपल्या जाणिवेत वाढतच असतो. मग ज्ञानदेव किंवा तुकारामच का, कालिदास किंवा मीराच का, स्वप्नवासवदत्तम् किंवा गाथासप्तशतीच का ––याचा उलगडा आपणाला होऊ लागतो. आधुनिक मराठी साहित्याला हे भाग्य अजून लाभायचे आहे–ते लाभेल अशी आपण सर्व आशा करू या.

साहित्याची ही जी ईयत्ता मी आता थोड्या आग्रहाने सांगितली ती प्राप्त करून घ्यायची असेल तर प्रत्येक साहित्यकाराला काही साधना करणे अवश्य आहे असे दिसून येईल. त्याचे सर्व जन्मजात वैशिष्ट्य मान्य करून तेवढ्याने भागत नाही असे म्हणावे लागते. या संबंधात तादात्म्य पाहिजे, एक मूलभूत कलात्म प्रामाणिकपणा पाहिजे, विशाल अनुभव पाहिजे, इत्यादी पुष्कळ गोष्टींचा पाठपुरावा करण्यात येतो. हेही सर्व कदाचित अवश्य असेल. परंतु मुख्य म्हणजे त्याची स्वतःवर श्रद्धा पाहिजे. ही श्रद्धा असली की बाकीच्या गोष्टी आपोआप जगून येतात.ही श्रद्धा त्याच्या एकंदर वृत्तीचा एक अपरिहार्य भाग झाला पाहिजे. ही स्वतःवरची श्रद्धा म्हणजे ममत्व नाही हे मात्र स्पष्ट केले पाहिजे. आपण जे काही लिहितो ते ' आपले ' नाही, ते एक देणे आहे, आपण केवळ निमित्त मात्र आहोत––अशा प्रकारच्या भावनेतून ही श्रद्धा मूळ धरीत असते. ' ईशावास्यमिदं सर्वम् ' हा तिचा एका वेगळ्या संदर्भातील आविष्कार आपल्या परिचयाचा आहेच. पूर्वीच्या ग्रंथात सुरुवात करण्यापूर्वी प्रथम देवादिकांना नमन करण्याची जी प्रथा होती तिच्या मुळाशी हीच दृष्टी होती. ती नंतर केवळ उपचाराचाच एक भाग झाली ही गोष्ट वेगळी. हे नमन सहज वाणले तरी पुरे होते. त्याने आपल्या सर्व वृत्ती मग स्थिर होतात. जे लेखन होते ते आपले असे एक आगळे रूप घेऊन येते, आपल्याला थोडे पुढे नेते, एक नवे आव्हान देऊन जाते. ' एतन्मया कथमहो कृतम् ' असे अकस्मात आपलेच शिल्प पाहून विस्मयाने उद्गार काढणाऱ्या वेरूळच्या शिल्पकाराची जी भावना झाली तशी भावना मग होऊ लागते. आता हे काही तरी गूढ आहे, कठीण आहे असे म्हणण्याचा पुष्कळांना मोह होईल. पण या अशा श्रेयस्कर गोष्टी गूढ असतात, कठीण असतात, हे समजले पाहिजे. याची जरी थोडीशी जाणीव झाली तरी जो साहित्यकार किंवा कलाकार होऊ पाहतो त्याला त्याची वाट सापडू शकेल.

हा थोडासा गूढ वाटणारा प्रश्न असाच सोडून आणि त्यात आपल्या साहित्यकाराला गुंतवून मी आता आस्वादकाला किंवा रसिकाला नेहमीच येणाऱ्या दुसऱ्या एका प्रश्नाकडे वळणार आहे.

... ... ... ...

आस्वादकाच्या बाबतीत एक प्रश्न नेहमीच भेडसावीत असतो. त्याला ' चिमणरावाचे चऱ्हाट ' ही आवडते आणि ' स्मृतिचित्रे ' ही आवडतात; बसंत सरवट्यांची व्यंगचित्रेही आवडतात आणि कृष्णा हेब्बरांची चित्रेही आवडतात; लता मंगेशकरांचे फिल्मी गाणेही भिडते आणि शरच्चंद्र आरोलकरांचे अभिजात संगीतही भिडते; तमाशातील एखाद्या वाळेकुंद्रीकरणीचा

अनुक्रमणिका

नान्ही भुलवतो आणि बालासरस्वतींचे दशावतारदर्शनही भुलविते. आणि मग त्याला पुष्कळ वेळा संभ्रम पडतो. वास्तविक या सर्वच आवडण्याच्या प्रकारात वावगे असे काहीच नाही. त्याला संभ्रम जो पडतो तो भलत्याच एकात्म कलासमीक्षेचा ध्यास घेतल्यामुळे. आपली काही प्रकाराबाबतची आवड थोडी गौण आहे, त्यामुळे आपण कुठेतरी चुकत आहोत अशी—तो थोडा विचार करणारा असला तर—समजूत करून घेतो. साहित्य किंवा कला यांच्या बाबतीत अशा पद्धतीने तर-तम भाव बाळगण्याचे वास्तविक तसे कोणतेच कारण नाही. आस्वादकाने खरी धास्ती बाळगायची असते ती वेगळीच आहे. जर आपणाला ‘ चिमणरावाचे चऱ्हाट ’, सरवट्यांची व्यंगचित्रे, इत्यादिच आवडत असली, ‘ स्मृतिचित्रे ’ ‘ हेव्वर इत्यादींचे दर्शन अनाकलनीय ठरत असले तर खरा धोका उत्पन्न होत असतो. जे आवडते त्यातील प्रत्येकात एक विभूतिमत् सत्त्व असते. तेवढ्यापुरते ते आपण ग्रहण करीत असतो. तेवढ्यापुरते आपण नम्र होऊन ते घ्यायचे असते. श्री. दत्तात्रेयांनी चोवीस गुरू केले, चोखंदळ आस्वादकाला आपल्या प्रवासात असे चोवीस हजार गुरूही करावे लागतात. याचाच अर्थ असा की आपले मन मोकळे ठेवले पाहिजे. नवनवीन आविष्कार ग्रहण करण्याची मनाची क्षमता वाढवली पाहिजे. आपल्या संवेदनांच्या व्यामिश्रकांतून नवीन नवीन संगती साधल्या पाहिजेत.

आस्वादकाने हेही लक्षात घेतले पाहिजे की सुदैवाने एका कलाप्रकारामुळे किंवा एखाद्या आविष्कारपद्धतीमुळे अन्य कलाप्रकार किंवा आविष्कारपद्धती या कधीच तशा बाद होत नाहीत. असे झाले असते तर मोठा अनवस्थाप्रसंग उद्भवला असता. लोकनाट्यही राहते. अभिजात नाट्यही राहते. एखादा विनोदी किस्साही राहतो आणि आर्त गीतही राहते. ग्रामीण भित्तिचित्रे राहतात आणि कांगडा शैलीही राहते. या सर्वांतून आपणांला जीवनातील वेगवेगळ्या संभावनांचा साक्षात्कार सतत होत असतो. आपणाला फरक करायला हवा तो ‘ राहणे ’ आणि ‘ रुजणे ’ यांच्यात. पुष्कळ गोष्टी राहतात, त्यांच्यात मी आताच सांगितल्याप्रमाणे एक विभूतिमत् सत्त्व असते म्हणून राहतात; पण जे रुजते त्यात ( आणि पर्यायाने आपल्यात ) काही तरी थोडे अधिक असते. ते पुष्कळ गोष्टींना छेद देऊन आपणाला एक सतत नवीन आकार देत असते. या दृष्टीने पाहिजे तर थोडा तर-तम-भाव आहे असे म्हणावे, पण त्यामुळे आपण भलत्याच उच्च-नीचत्वाच्या कल्पना बाळगता कामा नये. आपण जर असे करू लागलो तर आपल्या ग्रहणक्षमतेलाच बांध पडतील आणि आपल्या संवेदनांचा व्यामिश्रक हा प्राथमिक अवस्थेत राहील. महत्त्व आहे ते आपल्या विकासाचे. त्यासाठी जेथे जेथे जे मिळेल ते आपण आत्मसात केले पाहिजे.

... ... ...

या सर्वच संबंधांत अनुभवाचे एक बुजगावाहुले पुष्कळ वेळा उभे करण्यात येते. सर्वच गोष्टींना त्या नीट साधायच्या असतील तर त्या त्या संदर्भातील अनुभव अवश्य असतो. हे साहित्याला आणि सर्व कलांनाही लागू आहे. पण मुख्य गफलत होते ती अशी की हा जो काही ‘ अनुभव ’ म्हणून गणला जातो त्याला या चर्चेत प्रधान स्थान देण्यात येते. हा अनुभव मग एक प्रकारे साहित्याचा कच्चा मालमसाला ठरतो, तो घेत राहणे हे साहित्यकाराचे एक आद्य कर्तव्य ठरते, तो व्यक्त करण्याचीही त्याच्यावर एक जबाबदारी पडते. पण ‘ अनुभव ’ ही अशी काही बाहेरून घ्यायची वस्तू नसते. जो संवेदनाक्षम आहे त्याला हा अनुभव प्रत्यक्षात न मिसळता, गुंतून न पडताही, सतत येतच असतो. महत्त्व आहे ते त्याच्या वृत्तीचे, प्रत्यक्षाचे नव्हे. साहित्यकार हा पुष्कळ अर्थाने एक मुक्त जीव असतो, तो कशानेही बांधला जात नसतो. अनुभव घेण्याची किंवा येण्याची क्रिया त्याच्या बाबतीत अगदीच वेगळी असते. एक व्यक्ती म्हणून तो वेगवेगळ्या प्रसंगांतून, वेगवेगळ्या मनोऽवस्थांतून जातच असतो. त्याचे पडसादही त्याच्या साहित्यात उमटत असतात. पण म्हणून हे अनुभव जितके जास्त व उत्कट तितकी त्याची साहित्यिक इयत्ता अधिक असे समीकरण मांडता येत नाही. ही अशी जर समजूत करून घेतली तर ज्यांचा अनुभव जास्त आणि उत्कट ते सगळेच साहित्यकार झाले असते. बोटींवरचे खलाशी पुष्कळ आणि सतत प्रवास करतात, पण त्यांतला एखादाच कॉनरॅड साहित्यकार होतो. म्हणजेच कॉनरॅड अधिक महत्त्वाचा, तो जे काही बघतो, भोगतो हे केवळ एक निमित्त. वास्तविक साहित्यकाराच्या बाबतीत त्याची साहित्यकृती हाच अनुभव असतो. तिच्यात तो आपली अशी एक वेगळी

संगती साधीत असतो, ज्या संगतीतून एक वेगळी निर्मिती होते. ही निर्मिती जर नीट साधली तर ती प्रत्यक्षरूपच होते. ... ...

प्रत्यक्ष अनुभवापेक्षा अनुभव घेण्याची प्रक्रिया किंवा पद्धती ही साहित्यकाराच्या किंवा कलाकाराच्या बाबतीत अधिक महत्त्वाची असते. त्यांच्या सर्वच संवेदना एक प्रकारे मुक्त असतात. आणि त्या तशा मुक्त असतात. म्हणून तो कोठेही समभाव साधू शकतो. वेगवेगळ्या अनुभवांना तसे आंगिक महत्त्व नसते. एकच अनुभव-- मग तो कोणताही का असेना—जर संपूर्णपणे कडेला जाऊन आत्मसात केला तर ही प्रक्रिया त्याचा स्वभाव बनते. तिच्या माध्यमातून तो विविध दर्शने देऊ शकतो जसे मेघदूत त्याचे, तसा रघुवंशही त्याचाच असतो.

... ...

दुसरा प्रश्न मला सध्याच्या परिस्थितीत जो जिव्हाळ्याचा वाटतो तो म्हणजे संस्कृत भाषेसंबंधीचा प्रचलित शिक्षणातील दृष्टिकोण. मराठीच्या संदर्भात संस्कृत ही एक वेगळी भाषा आहे असे मी मानीत नाही. लॅटिन किंवा जुन्या ग्रीकप्रमाणे ती काही मृत भाषा नाही. ती एक जिवंत प्रचारातील भाषा आहे. सर्व संस्कृतोद्भव भाषांना तिच्याकडे वारंवार जावे लागते-- यापुढे इंग्रजीचे महत्त्व कमी झाल्यावर तर अधिकच जावे लागणार. आपण हे सर्व विसरून तिला मृतप्राय करण्याच्या खटपटीत आहोत असे खेदाने म्हणावे लागते. शाळांतून ही जवळजवळ गेलीच आहे, काही विद्यापीठांतून ही तिचे महत्त्व कमी झाले आहे. तांत्रिक शाळांतील विद्यार्थी तिला कायमचे पारखे झाले आहेत. याचे परिणाम आज जरी तितके दिसले नाहीत तरी लवकरच दिसू लागतील. मराठी तर त्याने दुबळी बनेलच पण ज्या व्यापक एकसंध भारतीय संस्कृतीचा आपण वारसा सांगतो ती संस्कृतीही खिळखिळी होईल. राष्ट्रीय एकात्मतेच्या विविध कार्यक्रमांत संस्कृताला कोणी स्थान दिल्याचे निदान माझ्या तरी ऐकिवात नाही. ते निश्चित आहे असे सांगणाऱ्यांनी आता पुढे आले पाहिजे.

संस्कृत ही कठीण आहे, क्लिष्ट आहे ; तिचा तसा आधुनिक युगात फारसा उपयोग नाही, शिक्षणाची व्याप्ती बहुजनसमाजात होण्याला तिच्यामुळे पुष्कळ अडचणी येतात ; असे या संदर्भात सांगण्यात येते. पण खरे पाहिले तर संस्कृत ही नुसती एक भाषा नाही, ती एक परिवर्धित विचारसरणी आहे. स्वच्छ, तर्कशुद्ध विचार कसा करावा, साहित्याचे रूप कसे सिद्ध करावे – हे, तिचे नियम व धाटणी, तिच्यावर आधारलेल्या भाषांना सतत दाखवीत असतात. हे ऋक्थ असे करंटे-पणाने नाकारून चालणार नाही. वेगवेगळ्या ज्ञान-शाखांचा विस्तार आपल्या मातृभाषेतून करताना तिच्यावाचून आपले पदोपदी अडून राहील. बहुजन-समाजाला संस्कृताचा वाटा झेपणार नाही असे म्हणताना आपण त्यांच्यावर अन्याय तर करतोच पण त्यांचा निष्कारण अधिक्षेपही करीत असतो. अन्याय अशासाठी की त्यामुळे आपण त्यांना एका विकासाच्या दिशेला वंचित करीत असतो. अधिक्षेप अशासाठी की त्यांची बुद्धिमत्ता काही तरी कमी आहे, त्यांना हे झेपणार नाही असे पर्यायाने आपण मान्य करीत असतो. पूर्वी ब्राह्मणांनी आपली विद्या सोवळी ठेवण्या-साठी त्यांना संस्कृत शिकू दिले नाही. आज आपण सर्वच शिकलेले, सत्तेवर असलेले नवे ब्राह्मण, जे नव्याने शिकू पाहात आहेत, मोठे होऊ पाहात आहेत, वेग-वेगळ्या ज्ञानशाखा हस्तगत करू पाहात आहेत--त्यांना सगळे काही सोपे-सोपे, पातळ करून शिकविले पाहिजे या कल्पनेने अजाणता जुन्याच परिस्थितीत लोटीत आहोत. शिक्षण ही एक तपस्या आहे, अपार परिश्रमाशिवाय विद्या होत नसते याची जाणीव सामान्यांना उपजतच असते. त्यांना योग्य मार्गदर्शन केले, अवश्य ती साधने उपलब्ध करून दिली तर ते या परिश्रमात कोणालाच हार जाणार नाहीत. पण आम्हीच असामान्यांनी आज काही तरी भलत्याच कल्पना उराशी बाळगून या सामान्यांची फसवणूक चालविली आहे.

शेवटी एक खुलाशाचा मुद्दा. अशुद्ध लेखनाच्या अलीकडील अशास्त्रीय आग्रहावर मी आधी बोलणार नव्हतो, आजही बोलणार नाही; पण माझे हे प्रस्तुत भाषण ज्या नियमांनुसार छापले आहे ते नियम मला मान्य नाहीत; हे सांगणे मात्र मला भाग आहे. नाही तर मीही या चक्रात सापडलो आहे असा आपला ग्रह व्हायचा. माझ्यापुरते तरी माझे जुने शुद्धलेखन येथे दंडार्ह झाले आहे--त्या नियमांतील तरतुदीला अव्हेरून. या नव्या पद्धतीने वाचताना किंवा बोलताना मला सतत पडसे झाले आहे की काय असा सारखा भास होतो. वर्ध्याच्या या थंडीतही तसे काही झालेले नाही हे आपणांला मुद्दाम सांगतो. माझी प्रकृती खरोखरच चांगली आहे

• • •



# परीक्षणे

## पोर्तुगेज–मराठे संबंध

लेखक–पांडुरंग पिसुर्लेकर; प्रकाशक–पुणे विद्यापीठ, १९६७, पृ. ३६०, किंमत रु १२.

' पोर्तुगेज–मराठे संबंध ' ही सात व्याख्यान–पुष्पे प्रो. पिसुर्लेकर यांनी पुणे विद्यापीठाच्या केळकर स्मारक व्याख्यानमालेत १९६३ त गुंफली, त्या वेळी व्याख्यात्यांचा बोलबाला आणि विषयाचे आकर्षकत्व यांमुळे ती फार लोकप्रिय झाली होती. श्रोतृवृंद गर्दी करी. त्या व्याख्यानांचे ग्रंथरूपाने प्रकाशन होण्याची इतिहासाभ्यासक वाट पाहात होते. त्यांना त्याची सुमारे ४ वर्षे वाट पाहावी लागली खरी; पण १९६७ त जेव्हा ते मोठे पुस्तक प्रकाशित झाले तेव्हा त्यातील भरघोस समग्र माहिती, सुंदर छपाई, आकर्षक वेष्टण, ऐतिहासिक छायाचित्रे, मोडी, पोर्तुगीज व फार्सी भाषांतील महत्त्वाच्या कागदपत्रांच्या प्रतिमा, काही व्यक्तींचे व किल्ल्यांचे फोटो, विधानांच्या समर्थनार्थ भरपूर टीपा, संदर्भांची विस्तृत यादी व शब्दसूची इत्यादी अंगोपांगांची समृद्धी पाहून जाणकारांना अत्यंत आनंद झाला असला पाहिजे, यात शंका नाही.

त्या वेळचे कुलगुरू म. म. पोतदार यांनी पुरस्कारात ' इतिहास नव्याने लिहविण्याचे सामर्थ्य या ग्रंथात आहे ' ' ग्रंथ अपूर्व आहे ' ' असा भरघोस आणि साधार ग्रंथ आजवर कोणत्याही भाषेत प्रसिद्ध झालेला नाही ' असे काढलेले उद्गार हे एका तज्ज्ञाचे म्हणून सहज शिरोधार्य मानले तरी हे शक्तिमन्तालाच पचविता येणारे फार पौष्टिक खाद्य आहे याची जाणीव ग्रंथ वरवर देखील चाळून पाहणाऱ्याला झाल्याशिवाय राहणार नाही. ' पोर्तुगेज-मराठे संबंध ' हे ग्रंथनाम आपल्याला केळकरांचे ' मराठे व इंग्रज ', हाताळकरांचे ' फ्रेंच-मराठे संबंधावरील पुस्तक ', शैलेंद्रनाथ सेनांचे ' अँग्लो-मराठा रिलेशन्स ' किंवा याच व्याख्यानमालेतील शेजवलकरांचे ' निजाम-पेशवे संबंध ' अशांसारख्या पुस्तकांची आठवण करून देते; परंतु ग्रंथाचा उपक्रमोपसंहार, रचना, विवेचन-प्रतिपादनाचा ढंग इत्यादी पाहता काही विशिष्ट सरणीप्रमाणे सलग कथन, सतर्क प्रतिपादन, सयुक्तिक सिद्धान्तन किंवा व्यापक इतिहासाच्या पार्श्वभूमीवरून केळकरांनी केलेले इतिहास आणि विवेचन असे दुबाजवी प्रत्ययकारी समालोचन या ग्रंथात मिळण्याची अपेक्षा ठेवता येत नाही हे ध्यानात येते आणि तेवढ्यापुरती तरी सर्वसाधारण वाचकाची निराशा होते..

परंतु पोर्तुगीज भाषेतील मराठ्यांच्या इतिहासाची साधने या दृष्टीने पाहण्याची इच्छा व पात्रता असणाऱ्या अभ्यासकांना प्रस्तुत ग्रंथ एक अमूल्य ठेवाच वाटेल. आणि ही सर्व साधने प्रा. पिसुर्लेकरांनी मुंबई विद्यापीठाच्या मार्फत संशोधकांना उपलब्ध करून देण्याचे महत्कार्य नुकतेच संपादिले असल्याने मराठ्यांच्या इतिहासावर त्यांचे फार मोठे ऋण झालेले आहे. पोर्तुगीज भाषेतील सर्व बारकावे आणि त्या भाषेतील अस्सल साधनांनी प्राप्त होणारी तपशीलवार माहिती यांचे पिसुर्लेकरांचे सूक्ष्म ज्ञान ' साधनांची व्याप्ती ' ह्या त्यांच्या पहिल्या ३७ पृष्ठांच्या प्रकरणावरून प्रतीत होते, तर ' उपसंहार ' या शेवटच्या २७ पृष्ठांच्या प्रकरणात त्यांच्या विविध सामाजिक, राजकीय, तपशिलाबाबतच्या जागरूकतेबद्दल कौतुक वाटते. केवळ कालानुक्रमाचा मागोवा घेत एका बाजूला पोर्तुगीज साधने व दुसऱ्या बाजूला मराठ्यांचा इतिहास–यात आला दुवा की जोडून दाखवून, चल पुढे, अशी तुटक शकावली पद्धतीने–जोडून मांडलेली मधली पाच व्याख्याने आणि शेवटचे उपसंहार हे प्रकरण यांमध्ये ज्ञानाच्या व रंजकतेच्या दृष्टीने जमीन अस्मानाचा फरक वाटतो. आणि पहिली सहा व्याख्याने वाचून जी माहिती होत नाही ती पोर्तुगीज व मराठे यांच्यातील शेजार, सहकारिता व परस्परांवर परिणाम करण्याची सामाजिक व राजकीय क्षमता यांच्याबद्दल सांगोपांग खरी माहिती सातव्या शेवटच्या व्याख्यानावरून होते आणि अशाच स्वरूपात प्रा. पिसुर्लेकरांनी सर्व मराठी-पोर्तुगीज संबंधांचे जरा रोचक पद्धतीने सलग कथन आणखी एका पुस्तकात करावे अशी त्यांस विनंती करावीशी वाटते.

पिसुर्लेकर यांचा प्रस्तुत ग्रंथ पाश्चात्त्य प्रगत देशात मान्य झालेल्या साधनप्रकाशनाच्या उत्कृष्ट परंपरेला धरून झालेला आहे,आणि इतिहासाच्या अभ्यासकांना पोर्तुगीज भाषेचे ज्ञान प्राप्त करून घेण्याचे ते आव्हानच आहे. त्यातील संदर्भ ( मूळ पोर्तुगीज ग्रंथांचे ) पोर्तुगीज भाषेतील अनन्त उताऱ्यांनी सजलेले आहेत. यातील फारच थोड्यांचे ओघात भाषांतर दिलेले आहे. बाकीचे कितीतरी अनुवादाच्या अभावी मराठी वाचकांच्या दृष्टीने केवळ अवडंबरच वाटण्यासारखे आहेत. परभाषेतील ग्रंथांची मूळ नावे विद्वत्तेला परिपोषक असली तरी केवळ मातृभाषाच जाणणाऱ्यांसाठी त्यांची भाषांतरे रसग्रहणास व जाणीव वाढविण्यास उपयोगी पडतील आणि त्यासाठी जागाही फारशी खर्च पडणार नाही. अधून मधून प्रत्ययासाठी पेरल्या गेलेल्या पोर्तुगीज शब्दांबद्दलही त्यांचे अर्थ जेथल्या तेथे किंवा एके ठिकाणी अशा शब्दांच्या कोशरूपाने देण्याने वाचकांना साह्य होणार आहे याची जाणीव विद्यापीठाच्या सार्वजनिक ज्ञानकक्षा वाढविण्यासाठी आयोजित केलेल्या व्याख्यानांच्या प्रकाशनाच्या व वितरणाच्या वेळी ठेविली जाणे आवश्यक आहे.

केवळ साधनांवर भर दिल्याने राहिलेले प्रत्यक्ष ग्रंथकर्त्याच्या अभिमताबद्दल संशय वाटण्यासारखे एक स्थान नजरेस आणले असता अशा ग्रंथाच्या रचनेत अभिप्रेत असलेली एक आवश्यक सुधारणा ध्यानात येईल. पृ. १३९ वर " मोंगलांकडून शाहू महाराजाने 'कोकणची जहागीर' मिळविल्यामुळे " इत्यादी विधान अगदी पहिल्याच ओळीत आलेले आहे. ते पोर्तुगीज साधनातून घेतलेले आहे हे तिसऱ्या परिच्छेदावरून स्पष्ट होते. परंतु प्रथम ते कर्त्याचेच मत आहे असे वाटते; पण नंतर हे शब्द मूळ कोणत्या शब्दावरून घेतले असतील तर, 'कोकणची जहागीर' या शब्दांचा जो अर्थ समजला जातो तोच मुळात आणि कर्त्याच्या मनातही तसाच आहे किंवा कसे याचे वास्तविक ज्ञान होत नाही. आणि अर्थात ते व्हावे याची गरज भासते. अशी अनेक विधाने अवतरण चिन्हांखेरीज वापरलेली आहेत. ती धड ग्रंथकर्त्याच्या विवेचनांतील स्वतःची विधाने नाहीत, डॉ. बाळकृष्ण यांच्या प्रसिद्ध शिवाजीवरील ग्रंथांतील अवतरणांप्रमाणे वेगळी राखलेली व दाखविलेली नाहीत, किंवा पत्रसारसंग्रहातील पत्रांच्या सारांशाप्रमाणे सर्वसंग्राहक मूळच्या संपूर्ण पण निवडक मजकुराच्या छायारूपही नाहीत.

म. म. पोतदार यांच्या पुरस्कारामध्ये याशिवाय तज्ज्ञाला सहज दिसणाऱ्या मोडी वाचनाच्या वगैरे अनेक त्रुटी दाखविलेल्या आहेत. त्यातील काही तरी नजरचुकीच्या म्हणण्यासारख्या क्षुल्लक नाहीत. यामुळे विद्यापीठाच्या प्रकाशनांबद्दल अधिक काळजी घेण्याची आवश्यकता सहज स्पष्ट होते. एवढ्या समृद्ध प्रकाशनात आणि विशेषतः इतकी अनेक स्थळे त्यात आली असता, त्यांचा समावेश होईल असा आधुनिक संपूर्ण नकाशा विषयाच्या समजुतीकरता असावयास पाहिजे होता. इतकी विविध प्रकारची माहिती ठासून भरलेल्या ग्रंथाचा वारंवार उपयोग करावा लागतो. उल्लेखित व्यक्ती व स्थळे यांच्या विशेषनामांसाठी जरा जाड किंवा वेगळा ठसा वापरून ती उठून दिसतील अशी सोय करण्याची काही प्रकाशकांची तऱ्हा पुनरुज्जीवित करण्यात या कसदार ग्रंथाच्या अभ्यासकांची सोय होण्यासारखी आहे.

दि. वि. काळे

◆ ◆ ◆

## मराठी रंगभूमीचा उषःकाल

लेखक–डॉ. मु. श्री. कानडे; प्रकाशक–व्हीनस बुक स्टॉल पुणे, पृष्ठे १४२; मूल्य पाच रुपये.

प्रस्तुत पुस्तकाचे (जाड टाइपांत) नांव आहे "मराठी रंगभूमीचा उषःकाल." कोणत्या कालाला "उषःकाल" म्हणता येईल हा पहिला मुद्दा. लेखकाने इ. स. १८८० ते १९०१ हा काल गृहीत धरला आहे. प्रस्तुत २०।२१ वर्षांच्या कालांत मराठी रंगभूमीशी ज्यांचा ज्यांचा म्हणून संबंध आला त्या सर्वांचा तरी या पुस्तकांत परामर्श घेतला गेला असेल असे सकृत्दर्शनी वाटते, परंतु वस्तुस्थिती तशी नाही. "किर्लोस्कर नाटक मंडळीचे व्यवस्थापक कै. त्र्यंबकराव साठे यांनी अनुभवलेला (लहान टाइपांत नावाचे मागे छापलेला मजकूर) एवढाच हा उषःकाल असून", कै. साठे यांच्या दैनंदिनी, पत्रव्यवहार आणि आठवणी यांच्या आधारे मराठी रंगभूमीच्या १८८० ते १९०१ या सुरुवातीच्या काळाबाबतचे एक रेखाचित्र काढणे एवढाच या पुस्तकाचा मर्यादित असा उद्देश आहे असे "नम्र निवेदन" ही लेखकाने प्रारंभीच केले आहे. वास्तविक

हे रेखाचित्र कै. त्र्यंबकराव साठे आणि वरील २०।२१ वर्षांतील फक्त किर्लोस्कर नाटक मंडळी यांचेच आहे. 'विषय' या दोहोंबाबतचाच आहे. त्यातल्या त्यात कै. साठे यांच्या संबंधीची माहिती देणे हाच मुख्य उद्देश दिसतो व त्याला प्राधान्यही देण्यात आले आहे. ताक मागावयास जाऊन भांडे लपविण्यापेक्षा "कै. त्र्यंबकराव साठे आणि किर्लोस्कर नाटक मंडळी" असे किंवा तत्सादृश एखादे गैरसमज उत्पन्न न करणारे सुस्पष्ट नाव दिले असते तर योग्य नसते का झाले ?

पहिल्या २४ पृष्ठांत कै. साठे यांच्या जीवनक्रमाचा आणि व्यक्तिगत गुणांचा परिचय करून दिला आहे. साठे यांचा जन्म इ. स. १८५९ मधला. संगीत व नाट्यकला यांची त्यांना लहानपणापासूनच आवड. इ. स. १८७७ ते १९२८ पर्यंतची आयुष्याची ५२ वर्षे त्यांनी सरकारी महसूल खाते, किर्लोस्कर नाटकमंडळी, मिरज, जमखंडी संस्थाने, गंधर्व नाटक मंडळी, घाटगे जहागीरदार इत्यादींच्याकडे व्यवहारदक्षतेने व प्रामाणिकपणाने नोकऱ्या करण्यात घालवली. १९३४ मध्ये त्यांचे देहावसान झाले.

इ. स. १८८४ ते १८९० या कालात किर्लोस्कर नाटक मंडळीचे आणि १९१३-१९१४ ह्या एक वर्षभर गंधर्व नाटक मंडळीचे ते व्यवस्थापक होते. कलाप्रेम, रसिकता, लोकसंग्रही वृत्ती, शिस्तप्रियता, सचोटी आणि नाट्यक्षेत्रातील विविध व्यक्तींना सांभाळून त्यांना संतुष्ट ठेवण्याची हातोटी, या गुणसमुच्चयामुळे साठे यांनी व्यवस्थापक म्हणून पडतील त्या सर्व जबाबदाऱ्या यशस्वीपणाने पार पाडल्या. नाटक मंडळींच्या भोंगळ कारभाराला त्यांनी शिस्त लावली.

यापुढील ७० पृष्ठांत (खंड २ व ३) भाऊराव कोल्हटकर यांच्या निधनापर्यंतची किर्लोस्कर नाटक-मंडळीची पहिल्या २०।२१ वर्षांची माहिती आली आहे. अण्णासाहेब किर्लोस्कर व त्यांची संगीत शाकुन्तल, सौभद्र, रामराज्यवियोग ही नाटके; गोविंदराव देवल व त्यांची विक्रमोर्वशीय, शापसंभ्रम, मृच्छकटिक, शारदा ही नाटके; तात्यासाहेब कोल्हटकर यांचे वीरतनय नाटक; मोरोबा वाघोलीकर, बाळकोबा नाटेकर, भाऊराव कोल्हटकर, रामभाऊ किंजवडेकर, चिंतोबा दिवेकर, कृष्णराव गोरे इत्यादी नट आणि त्यांची नाट्यकलेची सेवा; मंडळीच्या नाट्यप्रयोगार्थ ठिकठिकाणी सफरी; नाटकांना समाजाकडून मिळणारे प्रोत्साहन; नाटकांना होणारे उत्पन्न; मंडळीची आंतरव्यवस्था आणि भागीदारी; तत्कालीन नटवर्गाची दानत आणि नीतिमत्ता इत्यादींसंबंधी माहितीचा त्यात समावेश झाला आहे. "अण्णासाहेब किर्लोस्कर व भाऊराव कोल्हटकर यांची चरित्रे", "रंगभूमी मासिक", "समग्र किर्लोस्कर", "मराठी रंगभूमी" वगैरे पुस्तकांत वरील माहिती पूर्वी आलेली आहे. त्याबाबतच्या ऋणांचा उल्लेख लेखकाने तळटीपांत केला आहे, ही गोष्ट उल्लेखनीय आहे. कै. साठे यांच्या दैनंदिनीतून त्या वेळचे नाटकाचे दर, पात्रयोजना, उत्पन्नाची विभागणी, नटासाठी गुड कॉन्डक्ट फंड, राखीव फंड, मालकाच्या मृत्यूनंतर त्याच्या विधवा स्त्रीस आर्थिक मदत देण्याची व्यवस्था, मंडळीचा संस्था-निकांशी आलेला संबंध, नटवर्गाची एकंदर वर्तणूक यासंबंधी दिलेली माहिती मनोरंजक तर आहेच, पण आजच्या जमान्याला ती विशेष उद्बोधक आहे.

या संदर्भात पृष्ठे ९० ते ९५ यांत आलेली माहिती आचारसंहिता ठरविताना मार्गदर्शक होण्यासारखी आहे. त्या वेळच्या नटांच्या व्यसनासंबंधी व वर्तणुकीसंबंधी कै. साठे यांनी आपल्या दैनंदिनीत केलेल्या उल्लेखांपैकी काही अगदी संक्षेपरूपाने वरील पृष्ठांतून दिले आहेत. यापेक्षां पुष्कळच जास्त माहिती उपलब्ध असण्याचा संभव वाटतो. नटांची नावे गाळली आहेत. दारू पिऊन आले, भांडले, निंदा केली, गैरवर्तन केले एवढेच त्रोटक उल्लेख पुस्तकात घातले आहेत. काही असले तरी नट आपल्या कलेशी आणि धंद्याशी प्रामाणिक राहिले होते असे दिसते. भाऊराव कोल्हटकर ह्यांचे याबाबतीत पृष्ठ ९२ वर दिलेले उदाहरण त्यांची संस्थेवरील व कलेवरील निष्ठा स्पष्ट करते यांत शंका नाही. "त्या वेळच्या नटांना निरनिराळ्या व्यसनांची माहिती देण्याचे कार्य समाजांतील काही सुशिक्षित व प्रतिष्ठित स्नेह्यांनीच केले" असे मत प्रतिपादून नटांवरची जबाबदारी झाडून टाकणे इष्ट होईल असे वाटत नाही. काही नट निर्व्यसनी होतेच ना ? कै. साठे यांनी आपल्यापरीने शिस्त लावण्याचा प्रयत्न केला, हिशोब वगैरे काम चोख केले. नटांच्या लहरीपणांची उदाहरणे देण्याचे हे स्थल नव्हे परंतु आर्थिक भोंगळ कारभाराला आळा घालणारा कोणी-तरी "बी. कॉम् किंवा अकाउंटन्सीचा ग्रॅज्युएट नाटक-कंपनीचा मॅनेजर असावयास पाहिजे." हे कै. साठे यांचे म्हणणे रास्त वाटते.

पुस्तकाच्या उर्वरित ४५ पृष्ठांत किर्लोस्कर नाटक मंडळीने १८८४ ते १८९० या सहा वर्षांत कोणत्या नाटकांचे किती प्रयोग केव्हा व कोठे केले, आणि त्यांना उत्पन्न किती झाले यांचा तक्तारूप सारांश, कै. साठे यांचे द्वितीय चि. श्री. रामभाऊ यांनी लिहिलेल्या आठवणी आणि शेवटी भाऊराव कोल्हटकरांचे मृत्युपत्र यांचा समावेश आहे. ह्या आठवणी हृद्य व बोलक्या आहेत. विविध गोष्टींचे मार्मिक दर्शन त्यांत घडते. तसेच मृत्युपत्राने भाऊराव कोल्हटकर या गुणी, कलाप्रेमी नटाच्या कोवळ्या अंतःकरणाची साक्ष पटते.

श्री. रामचंद्र त्र्यंबक साठे यांनी (जतन करून ठेवलेली) माहिती पुरविली व तिचे संकलन आणि संपादन डॉ. मु. श्री. कानडे यांनी करून किर्लोस्कर नाटकमंडळीचे तत्कालीन चित्र मराठी नाट्यरसिकांसाठी उपलब्ध करून दिले यासाठी उभयतांचे अभिनंदन करणे इष्ट होय.

न. का. घारपुरे

◆ ◆

## प्राचीन मराठी जैन साहित्य

लेखक—डॉ. सुभाषचंद्र अक्कोळे, प्रकाशक—सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर-पुणे, १९६८, पृ. २१+३१५, मूल्य १५ रुपये.

पीएच. डी. पदवीसाठी मान्य झालेला हा प्रबंध प्रसिद्ध झाल्यामुळे इ. स. १४५० ते १८५० या चारशे वर्षांत मराठीत लिहिले गेलेले काही जैन वाङ्मय उजेडात आले. त्यामुळे मराठी साहित्याच्या ऐतिहासिक साधन सामग्रीच्या एका कप्प्यात भरीच भर पडली आहे. प्रस्तुत कालखंडातील उपलब्ध झालेल्या ५४ जैन ग्रंथकारांच्या अजमासे १५० ग्रंथांचा कालानुक्रमे इतिहास, त्या साहित्याचे वाङ्मयीन परिशीलन आणि त्याचे मूल्यमापन डॉ. अक्कोळे यांनी सादर केले ही बाब स्वागतार्ह आहे.

राजकीय व इतर भौतिक परिस्थितीच्या प्रभावाने जैन जनतेची आपल्या धर्मावरची श्रद्धा उडत चालली होती. ती सावरून धरण्याच्या प्रयत्नांतून हे साहित्य निर्माण झालेले आहे. प्राचीन काळच्या धर्माचार्यांनी प्रतिपादन केलेली जीवनमूल्ये शाश्वत मानून ती आपल्या समकालीन जनमनावर ठसविणे हा स्थूलमानाने या साहित्य-निर्मितीचा उद्देश होता. या वस्तुस्थितीमुळे प्रस्तुत ग्रंथाच्या नावात "प्राचीन" हा शब्द आला असण्याची शक्यता संभवते. वास्तविक हे साहित्य १५ व्या शतकाच्या मध्यास म्हणजे मध्ययुगात सुरू झालेले; पण त्याची अलीकडची मर्यादा इ. स. १८५०. तेव्हा 'मध्ययुग' हा शब्दही येथे लागू पडत नाही. कालखंडांची कल्पना स्पष्ट नसल्याने ग्रंथनामातील 'प्राचीन' शब्दाचा अर्थ काय ? असा प्रश्न पडतो.

समग्र ग्रंथ पाहिला तर मराठीत जैनांनी लिहिलेल्या साहित्याचा हा इतिहास आहे असे दिसते. पण साहित्याचा इतिहास म्हणजे राजकीय, सामाजिक, किंवा धार्मिक इतिहास नव्हे. राजकीय किंवा सामाजिक इतिहासाचे टप्पे प्रमाण मानून ते इतर क्षेत्रांत स्वीकारले जातात. परंतु विशिष्ट क्षेत्रातील घटनांचा विचार करून घडलेल्या परिवर्तनानुसार टप्पे ठरवून त्याप्रमाणे इतिहास लिहिला जाणे आवश्यक आहे. धार्मिक इतिहासाचे कालखंड साहित्याच्या किंवा चित्रकलेच्या इतिहासाच्या कालखंडाशी जुळलेच पाहिजेत असा आग्रह बाळगून चालणार नाही. पण येथे कालखंडाची कल्पनाच नाही आणि विषयाच्या कक्षेची मर्यादाही आखलेली दिसत नाही. जर हा साहित्याचा इतिहास असेल तर यात तत्त्वज्ञान, आचारधर्म आणि ऐतिहासिक व भौगोलिक माहितीची प्रकरणे अप्रस्तुत ठरतात. आणि हा सांस्कृतिक किंवा धार्मिक इतिहास व्हायचा असेल तर साहित्यविषयक प्रकरणांची मांडणी त्या धोरणाने झाली पाहिजे. अर्थात हा साहित्याचा इतिहास आल्याने येथे इतर तीन प्रकरणांचा विचार करण्याचे प्रयोजन नाही कारण जैनांनी दिलेली ऐतिहासिक माहितीही दंतकथात्मक आहे. (पृ. १७६)

व्यापार-उदिमाच्या निमित्ताने जैनश्रावक गावोगावी स्थिरावले तरी श्रवण किंवा धर्मप्रसारक कर्तव्यदृष्ट्या प्रांतोप्रांती फिरत असत. त्यामुळे त्यांच्या मनात देशाविषयी अलिप्तता होती. त्यांना भाषेसंबंधी अभिनिवेष असण्याचेही कारण नव्हते. या साहित्यात देशभाषेवरचे प्रेम किंवा प्रभुत्व यांचा अभाव जाणवणारा आहे. मराठी भाषेच्या अभिवृद्धीचा प्रयत्न जैनांनी केला असा आरोप करणे योग्य ठरणार नाही. मराठी जैन जनतेला धर्मकथा सांगायची तर ती त्यांच्या देशभाषेतून सांगितली पाहिजे. जैन ग्रंथकारांनी अशी परंपरेला धरून आपली दृष्टी मर्यादित ठेवली होती. म्हणून साहित्य-

निर्मितीच्या प्रेरणेपेक्षा किंवा जाणिवेपेक्षा व्यवहाराचा आणि पंथीय धर्मकर्तव्याचा भाग वलवत्तर होता, याचे आपणास भान राखले पाहिजे. अर्थात् याला काही अपवाद होते. जिनसागर, जनार्दन कवी यांना मराठीचा अभिमान होता. एकनाथ, मुक्तेश्वर, रामदास प्रभृतींचे मराठी ग्रंथ काही जैन लेखकांनी वाचले होते. याची प्रचीती काही ठिकाणी येते (पृ. २२१,२७९).

जैन वाङ्मय परंपरागत परभृत असल्याने त्यात चर्वितचर्वणच जास्त आहे. नवीन तेज किंवा स्फूर्ती नाही ही वस्तुस्थिती डॉ. अक्कोळे यांनी स्पष्ट सांगितली आहे.

या ग्रंथाच्या प्रस्तावनेतील डॉ. कोलते यांचे काही मार्मिक मुद्दे विचार करायला लावणारे आहेत. अन्य धर्मीयांच्या मराठी साहित्याला आपण मोकळ्या मनाने साहित्याच्या इतिहास-लेखनात महत्त्व देत नाही. पंथीय वा धर्मीय साहित्याचे निरनिराळे भेद कल्पून काही परिच्छेद किंवा प्रकरणे लिहिली जातात. हे बरोबर नाही. कालखंड निश्चित करून साहित्याचा इतिहास लिहिणे मराठी भाषेला हितावह व उपयुक्त होईल असे त्यांनी सुचविले आहे. डॉ. अक्कोळे यांच्या ग्रंथलेखनांतील काही विवाद्य मुद्यांचाही डॉ. कोलते यांनी सहानुभूतिपूर्वक परामर्ष घेतला आहे.

मराठी जैन साहित्याचा सर्वांगीण परिचय घडविण्याचा हा प्रयत्न काहीसा प्राथमिक स्वरूपाचा आहे याची डॉ. अक्कोळे यांना जाणीव आहे. पण "तो प्रयत्न नवीन, प्रामाणिक व भरीव पायावर उभा आहे." याची त्यांना खात्री आहे. विषयाच्या सीमारेषेची आखणी व्यवस्थित झाली असती तर या ग्रंथांचे वजन आणखी वाढले असते. अर्थात् येथे अप्रस्तुत असणाऱ्या प्रकरणांमधील माहिती अन्यत्र वरीच उपयुक्त ठरणारी आहे हे येथे नमूद केले पाहिजे.

एखाद्या विषयाची प्राथमिक माहितो उपलब्ध करून देण्यासाठी संशोधन क्षेत्रात Exploration चे कार्यही महत्त्वाचे असते. त्यादृष्टीने मराठी साहित्यात एक चांगली भर पडली असून गरजेनुसार साहित्याच्या इतिहासासाठी यातील जैन ग्रंथांचा विचार करणे अगत्याचे ठरेल. पुराण, चरित्र, कथा, स्तोत्र, अभंग, पद, लावणी, पोवाडा, पाळणा, भूपाळी, आरती इत्यादी रुळलेल्या नानाविध वाङ्मय प्रकारांबरोबर चम्पू, रास, बारमासी, फाग, विनती, बहुतरी, तीर्थवंदना, जैको, यांसारख्या कित्येक नवीन प्रकारांची रचना जैनांनी मराठीत केली. तसेच दूहा, रासभासा, चौपइभासा, वस्तु, सवैय्या, गायत्री छंद इत्यादी नवी पद्यरचना त्यांनी मराठीत आणली. पुराण-चरित्र लेखनावर जैनांनी भर दिला असला तरी त्यांनी हाताळलेले नवे प्रकार व नवे छंद यांचे मराठी साहित्यातील अस्तित्व प्रकाशांत आणण्याचे श्रेय डॉ. अक्कोळे यांचे आहे.

—मु. ग. पानसे

• • •

## प्रकाशन-डायरी १९६९

मुद्रक व प्रकाशक श्री. ग. दा. क्षीरसागर, १९९३ क, सदाशिव, पुणे २; ३॥ रु.

वर्षारंभी प्रसिद्ध होणाऱ्या शेकडो डायऱ्यांत 'प्रकाशन-डायरी' हा एक उठून दिसणारा अभिनव उपक्रम आहे. या डायरीचे प्रकाशक श्री. ग. दा. क्षीरसागर हे तरुण, हौशी व ध्येयवादी लेखक आहेत. गेल्या दोन वर्षांपासून 'प्रकाशन-डायरी,' 'विद्यार्थी-डायरी' व 'विज्ञान' नावाचे मासिक ते प्रसिद्ध करीत आहेत. प्रस्तुतच्या 'प्रकाशन-डायरी'त शिक्षण आणि साहित्य या दोन क्षेत्रांशी संबंधित असणाऱ्या सर्वांना उपयुक्त पडेल अशी माहिती त्यांनी दिलेली आहे. लेखक, प्रकाशक, ग्रंथविक्रेते, नियतकालिके, नवी व पारितोषिके मिळालेली पुस्तके यांच्या पत्त्यांसहित याद्या या डायरीत असल्यामुळे वार्षिक संदर्भकोश असेच स्वरूप तिला प्राप्त झाले आहे. धंदा आणि ध्येयदृष्टी ठेवून केलेला हा उपक्रम उत्तरोत्तर लोकप्रिय होईल असा विश्वास वाटतो.

• • •

## साभार स्वीकार

**अनुभवामृत** : ( भाषांतरासह संशोधित आवृत्ती ) कै. वा. दा. गोखले, नीळकंठ प्रकाशन, पुणे ९; ५ रु.

**द्व विरुपे सूत्रभाष्यम्** : ( कृष्णाचार्य विरचितम् ) संपा. विद्याधर शास्त्री भिडे, भारत इ. सं. मंडळ पुणे २; ५० पैसे.

**प्रकाशन डायरी ( १९६९ )** : मुद्रक व प्रकाशक ग. दा. क्षीरसागर, १४९३ क, सदाशिव ,पुणे २; ३॥ रु.

# परिषद वार्ता

( ३१-१-६९ पर्यंत )

**माधव जूलियन स्मृतिदिन :**

सुविख्यात पंडितकवी कै. माधव जूलियन यांचा स्मृतिदिन प्रतिवर्षाप्रमाणे २९ नोव्हेंबर ६८ रोजी परिषदेतर्फे साजरा करण्यात आला. या प्रसंगी श्री गोपीनाथ तळवलकर यांचे ' माधव जूलियन यांची नवता ' या विषयावर विचारपरिप्लुत व्याख्यान झाले अध्यक्षस्थानी प्रा. श्री. के. क्षीरसागर होते.

**लक्ष्मीबाई टिळक जन्मशताब्दी :**

सुप्रसिद्ध कवयित्री व ' स्मृतिचित्रां'च्या सुविख्यात लेखिका कै. लक्ष्मीबाई टिळक यांचा जन्मशताब्दी-समारंभ म. सा. परिषदेतर्फे दि. ८ डिसेंबर ६८ रोजी साजरा झाला. कवी सोपानदेव चौधरी हे मुख्य वक्ते म्हणून लाभले हा एक अपूर्व योगायोग होय. ' साहित्य-लक्ष्मीः व्यक्तिदर्शनात साहित्यदर्शन ' हा त्यांच्या व्याख्यानाचा विषय होता. या प्रसंगी श्री सोपानदेवांनी लक्ष्मीबाईंच्या काही हृद्य आठवणी सांगितल्या व त्यांच्या काही कविता गाऊन दाखविल्या. कवी कुसुमाग्रज तथा वि. वा. शिरवाडकर हे अध्यक्षस्थानी होते.

**साहित्य-चर्चा-मंडळ :**

या मंडळाच्या दोन बैठका झाल्या. १९ डिसेंबर १९६८ रोजी प्रा. आनंद यादव यांनी ' ग्रामीण कथेची बोली ' या विषयावर चर्चेचा उपन्यास केला, व दि. १६ जानेवारी १९६९ रोजी प्रा. गं. ना. जोगळेकर यांनी ' दिवाळी अंकातील कविता ' या विषयांवर टिपण वाचले. नेहमीप्रमाणे या विषयावर साधकबाधक चर्चा झाली.

**सत्कार :**

दि. २२ डिसेंबर १९६८ रोजी दुपारी ४ वाजता प्रा. गं. बा. सरदार यांचा, त्यांनी एकसष्टाव्या वर्षात पदार्पण केल्याबद्दल निमंत्रितांच्या उपस्थितीत सत्कार करण्यात आला. या प्रसंगी सर्वश्री श्री. ना. बनहट्टी, रा. शं. वाळिंबे, रा. श्री. जोग, मु. ग. पानसे आदींची गुणवर्णनपर भाषणे झाली.

वर्धा साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष प्राचार्य पु. शि. रेगे यांचा २२ डिसेंबर १९६८ रोजी, सायंकाळी ६॥ वाजता परिषदेतर्फे ' प्रतिभा सभागृहा'त प्रकट सत्कार करण्यात आला. प्रा. श्री. ना. बनहट्टी हे अध्यक्षस्थानी होते. या प्रसंगी सर्वश्री वा. रा. ढवळे, भीमराव कुलकर्णी, अ. गं. मंगरूळकर व रा. शं. वाळिंबे यांची रेगे— व्यक्ती व वाङ्मय या विषयावर भाषणे झाली.

परिषदेचे विश्वस्त श्री. वि. द. घाटे यांनी ७५ व्या वर्षात पदार्पण केल्याबद्दल दि. १८ जानेवारी १९६९ रोजी कार्याध्यक्ष डॉ. रा. शं. वाळिंबे यांनी त्यांना पुष्पहार घालून परिषदेतर्फे अभीष्टचिंतन केले.

' केसरी'चे सहसंपादक कादंबरीकार श्री. भा. द. खेर हे त्यांच्या नियोजित चरित्रविषयक कादंबऱ्यांच्या पूर्वतयारीसाठी रशिया, जर्मनी व इंग्लंडच्या दौऱ्यावर जात असल्यामुळे परिषदेतर्फे निमंत्रितांच्या उपस्थितीत दि. २० जानेवारी १९६९ रोजी त्यांना निरोप देण्यात आला. या वेळी सर्वश्री ग. ल. ठोकळ, श्री. ज. जोशी, अरविंद गजेंद्रगडकर, भीमराव कुलकर्णी, ग. वा. बेहेरे, विद्याधर पुंडलिक, स. शि. भावे, सरोजिनी बाबर, वि. शं. पारगावकर, मधुकर कुलकर्णी, रामभाऊ जोशी, वि. स. वाळिंबे, वि. ना. चव्हाण यांची श्री. खेर यांच्या स्वभाव व लेखन-वैशिष्ट्यांबद्दल भाषणे झाली. सभेचे अध्यक्ष डॉ. वाळिंबे यांनी परिषदेतर्फे त्यांना गुच्छ देऊन सत्कार केला.

**व्याख्यान :**

सुप्रसिद्ध गुजराती साहित्यिक श्री. शिवकुमार जोशी यांचे ६ जानेवारी १९६९ रोजी सायंकाळी ' गुजराती व मराठी रंगभूमी ' या विषयावर माहितीपूर्ण व्याख्यान झाले.

**भेटी :**

गेल्या तिमाहीत परिषदेला पुढील मान्यवरांनी भेटी दिल्या व परिषदेच्या कार्याची ओळख करून घेतली. (१) दि. २९ नोव्हेंबर ६८ — महसूलमंत्री श्री. बाळासाहेब देसाई, (२) दि. १९ डिसेंबर—पुण्याचे महापौर दि. शां. कद्दू व स्थायी समितीचे अध्यक्ष श्री. बाबासाहेब चव्हाण, (३) २१ डिसेंबर—पुणे महानगरपालिकेचे प्रशासक श्री. भुजंगराव कुलकर्णी व अधिकारीवर्ग सर्वश्री श्री. ए. के. जाधव, ल. वि. जाधव आणि एम्. एन्. तांबे. सदर प्रसंगी परिषदेतर्फे सर्वांचा सत्कार करण्यात आला.

**वर्धा संमेलन :**

वर्धा येथे दि. ४ ते ६ जानेवारी ६९ रोजी भरलेल्या म. सा. संमेलनाच्या ४८ व्या अधिवेशनास परिषदेतर्फे म. सा. महामंडळावरील प्रतिनिधी म. म. प्रा. द. वा. पोतदार, डॉ. रा. शं. वाळिंबे व श्री. मो. रा. वाळंबे हे उपस्थित होते. नागपूर येथील 'तरुण भारत' या दैनिकाच्या रौप्यमहोत्सव—समारंभास वरील तीनही प्रतिनिधी उपस्थित होते. परिषदेतर्फे कार्याध्यक्ष डॉ. वाळिंबे यांनी 'तरुण भारत'चे संस्थापक कै. नरकेसरी अभ्यंकर यांच्या छायाचित्रास हार अर्पण केला.

**कै. ह. ना. आपटे पारितोषिक :**

परिषदेतर्फे दरवर्षी गतसालात प्रसिद्ध झालेल्या उत्कृष्ट कादंबरीला रु. ५१ चे 'ह. ना. आपटे पारितोषक' दिले जाते. यंदा हे पारितोषिक कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २ यांनी प्रसिद्ध केलेल्या श्री. शिवाजी सावन्त यांच्या 'मृत्युन्जय' या कादंबरीला देण्यात आले. प्रा. गो. म. कुलकर्णी व प्रा. म. ना. अदवन्त यांच्या परीक्षक समितीने पारितोषिकाची शिफारस केली होती.

● ● ●

## म. सा. परिषदेबद्दलच्या आठवणी पाठवा.

महाराष्ट्र–साहित्य–परिषदेचा हीरक–महोत्सव समारंभ लवकरच साजरा होणार असून त्या निमित्ताने परिषद एक स्मरणिका काढणार आहे. त्यासाठी परिषदेशी ज्यांचा संबंध आला, अशा व्यक्तींनी परिषदविषयक व परिषदेने भरविलेल्या १ ते ४५ क्रमांकांच्या साहित्य–संमेलनांविषयी काही महत्त्वाच्या आठवणी, शक्य तितक्या लवकर, चिटणीस, हीरक–महोत्सव समिति, म. सा. परिषद, टिळक रोड, पुणे २ या पत्त्यावर पाठवाव्या.

**भीमराव कुलकर्णी**
चिटणीस
म. सा. परिषद, हीरक-महोत्सव- समिती.

# पत्रव्यवहार

## गोखले व मेळ्यांची पदे

श्री. संपादक महाराष्ट्र सा. पत्रिका यांसी—

जुलै–सप्टेंबर १९६८ च्या पत्रिकेत गोखले चरित्राच्या परीक्षणात पृ. ७० स्तंभ २ मध्ये सन्मित्र समाज मेळ्याची पदे चरित्रकाराने द्यावयास पाहिजे होती असे म्हटले आहे. ही पदे मी वयाच्या १२ व्या वर्षी ऐकली आहेत व त्या वेळीही मला ती विचकट वाटली. उदाहरणार्थ एका पदाचा प्रारंभ—

आई वघ हा माझा बाळ। गे।
पाहि तुझा गोपाळ ॥ ध्रु० ॥
कुठे हिरा हा कुठे हीर हा,
कुठे रवी कोळसा कुठे।
शुद्धशील हा राजहंस वघ
हा मोरीतिल गाळ। गे–

पुढे कॉलेजमध्ये ‘ हॅम्लेट ’ नाटक वाचल्यावर ध्यानी आले की हॅम्लेटने आपल्या मातेला उद्देशून केलेल्या भाषणाचे प्रतीक यात घेतले होते—

“ look at this picture and on this a Hyperion to a Satyr” असा त्याचा आरंभ आहे

आणखी एका पदात १९०८–९ मध्ये शिक्षा झालेल्या राष्ट्रीय संपादकाच्या हालअपेष्टांचे वर्णन एका ओळीत करून दुसऱ्या ओळीत गोखलेमात्र ख्यालीखुशालीत मग्न आहेत असे दर्शविले आहे. दुसऱ्या ओळी अशा–

( १ ) हा प्रोफेसर छवी खुलाया करतो तिनदां दाढी।

( २ ) वसलासे हा लावित अपुल्या ‘ चेरीब्लासम ’ गाला।

( ३ ) चार पावले जाया याला घोडागाडी व्हावी।

( ४ ) याला व्हाव्या गाद्यागिरद्या पलंग मच्छरदाणी।

हे वैयक्तिक बोचक उल्लेख मला वयाच्या वाराव्या वर्षीही अप्रशस्त व निष्कारण वाटले.

‘ हिंदु पंच ’ देखील त्या काळात अशीच विचकट चित्रे काढीत होता. गोखले मेथा यांची तोंडे व खाली लुगडे नेसलेल्या स्त्रियांची शरीरे! वयाच्या १२ व्या वर्षीहि मला हे विद्रूप वाटले. “मेथा शेट्याणी गोखले बाईंचे डोके खाली नमवून आपण स्त्रियांनी खाली मान घालून चालले पाहिजे ” असे म्हणतात. हे त्यातले एक चित्र आठवते. कोठे तरी नेमस्त पक्षीयांनी आपल्या मागण्या नम्रपणेच मांडल्या पाहिजेत असे सर फेरोजशहांनी भाषण केले असावे. त्यावर हे चित्र होते. गोखल्यांनी ‘ हिंदुपंचा ’ वरही फिर्याद केली व ‘ हिंदुपंच’कारांना माफी मागावी लागली तशीच सन्मित्र समाज मेळ्याच्या चालकांनीही माफी मागितली, असे माझ्या अंधुक स्मृतीत आहे.

टिळकांसह अनेक राष्ट्रीय पक्षाचे लोक तुरुंगात सरकारने धाडले. त्यावद्दलचा राग गोखल्यांवर कशाला उगवीत आहेत, असे मला वयाच्या १२ व्या वर्षीही वाटले.

ग. वि. केतकर

• • •

अनुक्रमणिका

